# HISTORY OF THE NATIVE STATES.

## PART II.

Description of the exploits of Great Rajaput Princes, The powers and The Past system of Government, The causes of the internal quarrels, Treaties with the English, Evils and their undesirable results consequent on the foreign rule.



(COMPILED WITH THE AID OF MANY ENGLISH AUTHORS, OLD DOCUMENTS, MEMOIRES AND TRADITIONS.)

BY THE AUTHOR

OF

SHRI RADHA AND KRISHNARAO, SAUBHAGYAMANDIR, &c., &c.



Bombay:
PRINTED AT THE INDIAN PRINTING PRESS.

1889.

MR. G. M. *Sa[illegible]e, Registrar of Native publications*, in his Report to Government for the year 1888 says :—" Among the *Historical* works of the year, " *History of the Native States*, Chapter I," by Mr. Limaye, gives much useful information.

To

SHRIMANT

VEDA SHASTRA SAMPANNA.

**YAJNYESHWARA BALKRISHNA DIXIT.**

THE WORTHY PRECEPTOR OF THE PESHWAS.

JAHAGIRDAR KAYAGAV STATE &c. AND
HON. MAGISTRATE,

SHENDURNI
KHANDESH DISTRICT.

---

This humble work is dedicated as a
token of regard for his thorough
appreciation of literary merits,
in spread of learning
among the
Natives,

WITH HIS PERMISSION

BY THE AUTHOR.

॥ श्री ॥

स्व विद्यांविषयीं परमरसिक व मर्मज्ञ.

श्रीमंत

**वेदशास्त्रसंपन्न राजश्री,**

**यज्ञेश्वर बाळकृष्ण दीक्षित.**

पेशवे सरकारचे गुरु आणि ऑनररी

माजिस्त्रेट व जहागिरदार,

संस्थान

**कायगांव वगैरे परगणा**

**शेंदुरणी,**

जिल्हा खानदेश

यांस,

हें स्वदेशसुधारणा आणि एतद्देशीय लोकांमध्यें विद्या-

वृद्धि होण्याकरितां जे निरपेक्ष श्रम घेतात

ते जाणून साश्चर्य मनोभावानें अत्यंत

सन्मानपुरस्सर व कृतज्ञतापूर्वक,

**हा ग्रंथ,**

कर्त्यानें त्यांजला नजर केला असे.

ग्रंथकार.

# नेटिव राजांचा इतिहास.

## भाग दुसरा.

### प्रकरण पहिलें.

### उदेपूर अथवा मेवाड.

पूर्वीच्या जुन्या बखरी व ऐकीव गोष्टी यांवरून असें समजतें कीं, मुसलमान लोकांच्या स्वाऱ्या व लढाया चालल्या असतांना, जिंकलें न जातां आपल्या गादीचें स्वातंत्र्य कायम राखिलें असें संस्थान केवळ उदेपूर होय. गिझनीच्या महंमदानें अटक नदी उतरून हिंदुस्थानावर स्वारी केली, त्यावेळीं उदेपूरच्या राण्याच्या ताब्यांत जितका मुलूख होता त्यांतील तिलप्रायही प्रदेश त्याचे ताब्यांतून मुसलमानांच्या हातीं न जातां, आजकाल सुद्धां तो सर्व प्रदेश त्या राण्याचे गादीच्याच ताब्यांत आहे.

राजपुतान्यांत हल्लीं जीं राजघराणीं राज्यासनावर विराजमान आहेत तीं सर्व राज्यभ्रष्ट केलेल्या राजघराण्यांचे अवशेष होत; किंवा स्वपराक्रमानें ज्यांनीं राज्यें स्थापन केलीं त्या कनिष्ठ घराण्याचे वंशज होत. त्या उदेपूरच्या अक्षतवीर्यामुळें जरी त्यांची सत्ता कमी आहे तरी, त्यांस पूर्वीच्या वैभवामुळें मोठा मान मिळतो आणि खरोखर हें उदेपूरच्या हल्लींच्या राण्याचेंही मोठें भूषण व भाग्य होय कीं, अशा पराक्रमी राजवंशांत त्यांचा जन्म झाला.

उदेपूरच्या राण्याचे कुळाचा शोध करीत करीत अति-शय प्राचीनकाळापर्यंत गेलें तर कांहींएक दिसेनासें होतें. तथापि पुष्कळ बलवत्तर प्रमाणांवरून, उदेपूरच्या राण्याचा ख्रिस्ती शकाच्या दुसऱ्या शतकांत विश्वासघात झाला होता, इतकें मात्र सिद्ध होतें. या भयंकर कत्तलीचेसमयीं राजाची बायको सुदैवानें अन्य ठिकाणीं गेलेली असल्या-मुळें ती मात्र या कत्तलींतून बचावली. यावेळेस ती गर्भवती होती, व पुढें ९ महिने पूर्ण भरल्यावर प्रसूत होऊन तीस मुलगा झाला. मुलाचा जन्म होतांच राणीनें त्यास एका वि-श्वासु ब्राह्मणस्त्रियेचे ताब्यांत देऊन तिला सांगितलें कीं या मुलाचें तूं आपल्या मुलाप्रमाणें पालनपोषण कर. असें सांगून, "तिनें आपले पतीसहवर्तमान अक्षय सुख भोग-ण्यासाठीं चिता प्रज्वलित करून अग्निकाष्ठें भक्षिलीं." उदेपूरच्या राण्याचा मूळ वंशज जो बापू रावळ तोच हा मुलगा होय.

श्रीमंत लोकांच्या मुलांप्रमाणें या ब्राह्मणस्त्रीकडून त्याचें पालनपोषण चाललें असतां, या मुलानें आपले नैस-र्गिक पराक्रमातिशयानें व अद्वितीय साहसादि गुणांनीं लहानपणींच अरण्यवासिजनांस थक्क करून सोडलें. त्यानें पक्षांची पारध करावी, नेहमीं रानांत शिकारीस जाऊन वनपशूंस मारावें, फार तर काय, पण त्या रानांतील भिल्ल लोकांचीं समवयस्क मुलें जो पराक्रम करीत असत, त्यांचा नायक होण्याजोगा असा एके दिवशीं त्या मुलानें कांहीं अद्वितीय पराक्रम केल्यावरून, त्यास सर्व भिल्लांचे मुलांनीं "तुला आह्मीं आपला राजा करतों" असें सुच-

विलें; आणि त्यांतील एका मुलानें याबद्दलची आपली दृढ इच्छा दाखविण्याच्या हेतूनें, "आपली करंगळी कापून त्यांतून जें रक्त वाहात होतें त्याचा टिळा त्याचे कपाळीं लावून त्यास राजा केला." नंतर त्या मुलांनीं भिल्ल लोकांच्या मुख्याकडे जाऊन, आह्मीं यास राजा केला आहे, असें सांगितलें, व त्या मुख्यानेंही या मुलाचें धाडस पाहून त्या मुलांनीं कळविलेली गोष्ट मोठ्या आनंदानें मान्य केली.

बापू रावळ वयांत आल्यावर त्यानें पराक्रमाचीं पुष्कळ मोठमोठीं कामें केलीं. पुढें माळव्यांतल्या एका राजघराण्यांतील मुलीशीं त्याचा संबंध झाला. ज्या म्लेंच्छ लोकांनीं त्याचें राज्य हिरावून घेतलें होतें, त्या म्लेंच्छांस यानें पुढें हांकून दिलें, आणि सर्व राज्यकारभार स्वतः पाहूं लागला. राज्याचें मुख्य ठिकाण चितोर केलें. येथें राहून त्यानें सर्व राजपुतान्याचा कारभार उत्तम रीतीनें चालविला. तो मृत्यु पावला त्यावेळेस त्याचें वय १००वर्षांचें होतें. यानें ८ वे शतकांत राज्यसूत्र आपले हातीं घेतलें व त्याच वेळेस चितोर शहरास वेढा घातला. हा व सामर्सी यांच्यामध्यें ५०० वर्षांचा फरक आहे. १२ व्या शतकांत सामर्सी याची मोठी भरभराट होती. हा मोठा योद्धा होता. त्यावेळचे कवि त्याचें फार उत्तम रीतीचें वर्णन करितात. हा लढण्याचे कामांत मोठा शूर, शांत आणि बुद्धिमान् असा होता. राज्यकारभारांत तर दूरदृष्टि, शहाणा आणि मोठा स्पष्टवक्ता असा होता. त्याचे सरदार लोकांची त्यावर अत्यंत प्रीति असे. सर्व संस्थानिक त्यास फार सन्मान देत. दिल्लीचा हिंदु राजा, त्याचा मेहुणा जो पृथ्वीराज याच्याबरोबर सामर्सी

हा हिंदुस्थानावर तार्तरी लोक स्वाऱ्या करीत होते त्यांच्याशीं लढण्यास जात असे. तेथें जी मोठी लढाई झाली ती एकसारखी तीन दिवसपर्यंत चालली होती. तीमध्यें हिंदु लोकांचा जय झाला व तार्तरी आणि त्याचे सर्व सरदार यांचा पराजय झाला.

सामर्सीचे मागून त्याचा मुलगा कर्ण गादीवर बसला. त्याच्या मागून पुढें थोड्याच दिवसांनीं सामर्सीच्या भावाचा मुलगा रहप गादीवर बसला. यानें उदेपूरच्या राण्याचें उपनांव "रावळ" होतें तें बदलून "राणा" असें केलें. तेव्हांपासून तों आजपर्यंत एकसारखें हेंच नांव चाललें आहे. रहप पासून लकमसी पर्यंत ९२ वर्षांच्या अवकाशांत चितोरास ९ राजे गादीवर बसले. या नवांपैकीं ६ लढाईंत पडले. याच अवकाशांत आपआपसांतील तंटे व लढाया पुष्कळ झाल्या.

इ० सन १२७५त राणा लकमसी आपले बापाचे गादीवर बसला. चितोरच्या हद्दीवर याच वेळेस मुसलमान लोकांनीं स्वाऱ्या केल्या. त्यावेळेस राजा लहान होता ही संधि पाहून दिल्लीचा बादशाहा अल्लाउद्दीन यानें चितोरावर हल्ला केला, तो मोठ्या शौर्यानें भीमसिंगानें मागें हटविला. इ०सन १३०३ मध्यें मुसलमानांनीं पुन: हल्ले करण्यास सुरवात केली. यावेळेस राण्यानें आपला वंश विच्छिन्न होऊं नये ह्मणून, आपला एक मुलगा खेरीज करून बाकीचे सर्व मुलगे बरोबर घेऊन प्रथम मोठ्या निकरानें व आपल्या शौर्याची पराकाष्ठा करून प्रजेचें रक्षण केलें आणि शेवटीं शत्रूचे सैन्यावर चाल करून त्यांतील लक्षावधि लोकांस

मारतां मारतां त्यानें आपल्या देशाच्या रक्षणार्थ त्या रणयज्ञांत आपल्या अमूल्य प्राणाची आहुति दिली. याप्रमाणें राण्यानें परलोकवास केला; तरी त्याचा मुलगा यत्किंचितही डगमगला नाहीं. त्याचा वडील भाऊ अमीर नांवाचा—ज्याचे हातून स्वदेशाचें रक्षण व्हावयाचें होतें—तो याचे मदतीस तयार होता.

अमीर हा आपल्यापेक्षां मोठा शूर आणि राज्यकारभारांत मोठा दक्ष आहे असें पाहून, लक्ष्मसीचे मुलानें आपण राज्यापासून परावृत होऊन त्याचे स्वाधीन सर्व राज्य केलें. याप्रमाणें आपसांत—तंटे न करितां—एकी झाली यामुळें त्याच्या प्रजेस फार सुख झालें.

त्यानें आपले राज्यांतील लोकांस अल्लाउद्दीनाविषयीं इतका तिटकारा आणि द्वेष उत्पन्न केला कीं, अल्लाउद्दीनानें चितोरचा मुख्य रजपूत जो बलदेव त्याचे स्वाधीन राज्य करून व त्यास आपला संस्थानिक करून आपण लढाई न करितां दिल्लीस निघून गेला. नंतर लवकरच इ०सन १३१३ त अमीरानें आपले पूर्वजांची गादी यवनांपासून हिसकावून घेतली; आणि अल्लाउद्दीनाचा मुलगा मोठें सैन्य घेऊन चितोर घेण्याकरितां येत असतां, त्याचा लढाईंत पराभव करून, अमीरानें त्यास कैद केलें.

अमीराचे अल्लाउद्दीनानें घेतलेले चार परगणे, व एक लाख रुपये आणि १०० हत्ती इतकी खंडणी देण्याचें कबूल करी तोंपर्यंत त्यास कैदेंतून सोडलें नाहीं. अमीर राजाचे कारकीर्दींत राजपुतान्याचें वैभव फार झळकूं लागलें. हिंदुस्थानांतील सत्ताधीश असा काय तो अमीर हा

एकच होता. बाकी सर्व जुनीं घराणीं अगदीं क्षयावस्थेप्रत गेलीं होतीं. हल्लींचे जयपूरचे व जोधपूरचे राजांचे पूर्वज व त्याचप्रमाणें राजपुतान्यांतील इतर सर्व राजे याचे संस्थानिक झाले. त्यांनीं अमीर राजाचा चांगला बहुमान केला; आणि त्याची आज्ञा ते शिरसावंद्य करीत. अमीर राजानें हिंदुलोकांस पराक्रम दाखवून, प्रिय असें जें स्वराज्यसुख त्याचा लाभ त्यानें सर्व हिंदुस्थानवासी जनांस करून दिला.

अमीरानें पुत्रवत् प्रजापालन करून आपले राज्यांतील लोकांची मोठी भरभराट केली. तो इ० सन १३६५ त मृत्यु पावला. त्याचे नांव अजूनपर्यंत मेवाडांत मेवाडचे सर्व राजांमध्ये अत्यंत शूर, शहाणा, दक्ष, आणि स्वपराक्रमानें सुदृढ केलेलें आणि मोठे प्रचंड सत्तायुक्त असें विस्तृत राज्य आपले संततीस करून ठेवणारा असें सर्वतोमुखीं गाजत आहे. त्याचा मुलगा राणा रैवतसिंह हा आपले पराक्रमीं पित्यानुरूप शूर असा होता. त्यानेंही स्वपराक्रमानें पुष्कळ मुलूख काबीज केला आणि आपले राज्यास जोडला. फार काय पण बाकरोल येथें लढाईंत त्यानें बादशाहाचाही पराभव केला. पुढे दुर्दैवानें बनोडा येथील संस्थानिकाशीं त्याचा आपसांत कांहीं तंटा चालला असतां तो मारला गेला. या बनोडच्या संस्थानिकाच्या मुलीशीं तो विवाहसंबंध करणार होता.

त्याचे मागून लाखा राणा गादीवर बसला. हा मोठा राजकार्यधुरंधर व युद्धकलानिपुण असून कलाकौशल्याचा आश्रयदाता होता. यानेंही स्वराज्य वाढवून,

त्यांपेक्षां एक चांगलें कृत्य केलें. तें असें कीं, त्यानें आपली हद्द नियमित केली आणि जोरा येथें रुप्याच्या खाणीचें काम सुरू केलें. दिल्लीचा बादशाहा महमदशहा लोदी याचा त्यानें रणांत पराभव केला, आणि त्याचे सैन्यास प्रांतांतून हाकून देत असतां मारला गेला. शिल्पकलांना चांगला आश्रय देऊन ज्यांनीं स्वदेशाचे कल्याण केलें, त्यापैकींच हा एक राजा होता.

लाखा राणा मेल्यावर मोकलाजी गादीवर बसला. याचें रक्षण त्याचा वडील भाऊ चांद यानें राज्यसुखविरक्त होऊन केलें. मोकलाजी वयांत आल्यावर त्यानें आपले पूर्वजांप्रमाणेंच शौर्य आणि पराक्रम लोकास दाखवून तरवार गाजविली. अशा प्रकारें एकावर एक पराक्रम व लढाया करून लोकांस शौर्य दाखवींत असतां तो "मदेरिआ" येथें कपटानें मारला गेला.

मोकलाजीच्या मागून कुंभराणा गादीवर बसला. हा एक अद्वितीय दक्ष, हुशार, आणि राजकार्यधुरंधर असा होता. त्याच्या पूर्वजांनीं निरनिराळ्या राजाच्या उत्तम उत्तम गुणांनीं मिळून या राजाच्याठाईं जणूं काय वास्तव्यच केलेलें होतें. याचा उत्साह अजीर राजाप्रमाणें असे. हा लाखा राण्याप्रमाणें कला, शिल्प, व इतर सर्व विद्यांचा आश्रयदाता होता. याची बुद्धि विशाळ असून, तो मोठा पोक्त व उत्तम विचारी होता. युद्धकलेंत तर अद्वितीय योद्धा व धनुर्धर असा होता. इ० सन १४४० त माळवा आणि गुजराथ येथील नबाबांनीं एकत्र होऊन याच्यावर स्वारी केली त्यांत याने मुसलमा-

नांस दे माय धरणी ठाय असें करून त्यांची त्रेधा त्रेधा करून सोडिली आणि माळव्याच्या नबाबास कैद करून त्याच्याकडून खंडणी न घेतां, उलटें त्यास नजर नजराणे व चांगलीं बक्षिसें देऊन संतुष्ट करून बंधमुक्त केलें. शेवटीं त्यानें लढाया मारीत मारीत दिल्लीच्या बादशाहाचा सुद्धां पराभव करून स्वराज्याचें उत्तम रीतीनें पालन करतां यावें ह्मणून मोठमोठे बत्तीस किल्ले बांधिले, आणि परचक्राच्या सर्व रस्त्यांवर तटबंदी केल्या. एवढा हा महापराक्रमी असून शिवाय परम रसिक, विद्वानांच्या गुणांचा पूर्ण उपभोक्ता व स्वतांही उत्तम कवि होता. " परम लावण्यवती व रूपवती असून सौंदर्याची केवळ खाणच होय अशा स्त्रीशीं यानें लग्न लाविलें." यावरून तो केवळ विषयसुखास्वादपराङ्मुख आणि अरसिक होता असा जो त्याच्यावर कित्येक ग्रंथकारांचा आरोप आहे तो खरा असावासें दिसत नाहीं.

कुंभराणा याणें ५० वर्षें मोठ्या सुखानें राज्य केलें. त्याच्या राज्यांत प्रजा फार सुखी होती. परंतु मोठ्या दुःखाची गोष्ट ही कीं, यास त्याच्याच मुलानें *राज्यलोभानें कपट करून ठार मारलें.

---

* राज्यलोभ आणि स्त्रीलोभ फार अनर्थकारक आहेत. यांच्या लोभानें मनुष्य केव्हां काय करील याचा नेम सांगवत नाहीं. राज्यलोभाकरितां प्रत्यक्ष बापासही ठार मारण्यास मनुष्य चुकत नाहीं हें किती विचित्र आहे ? त्याप्रमाणें यानेंही आपल्या बापास मारून आपण राज्यावर बसला. परंतु परमेश्वरानें त्याच्या दुष्टकृत्याचें फळ त्यास याच लोकीं भोगावयास लाविलें. जे लोक लोभानें अंध होऊन मागें पुढें न पाहातां भलभलतीं कामें करितात त्यांनीं यावरून बोध घ्यावा.

पितृहत्या करणारा उदा हा बापाचे मागून गादीवर बसला. याला इतिहासांत "हतार" किंवा "घातक" असें ह्मणतात. यानें फार थोडे दिवस राज्य केलें. (राज्यावर बसून चार वर्षे झालीं नाहींत तोंच त्यानें आपले पूर्वजांचे कीर्तीस कलंक लावून आपले राज्याचें वैभव अस्तंगत करून टाकिलें.) पुढें त्याचा बंधू रिमल यानें त्यास देशाबाहेर हाकून लावल्यामुळें तो दिल्लीस पळून जात असतां वाटेंत विज पडून पुष्कळ हाल होऊन मृत्यु पावला.

इ० सन १७७४ त रिमल गादीवर बसला. त्यानें गादीवर बसतांच प्रथम दिल्लीच्या बादशाहाचा पराभव केला. बादशाहानें याच्या पुतण्याचा पक्ष घेतला होता, तरी त्यानें आपल्या पुतण्यानें त्याच्या अपराधाची क्षमा केली. यामुळें ते त्याचे मोठे विश्वासू आणि उमदे असे चाकर बनले. माळवा येथील मुसलमान राजाचा त्यानें युद्धांत पराभव केला. दुर्दैवानें त्याच्या मुलाचें त्याशीं बनत नसे, यामुळें त्याला संसारसुख मिळावें तसें मिळालें नाहीं. पुढें कांहीं दिवसांनीं एकाएकीं राणा रिमल हा मृत्यु पावला. याचे राज्यांत प्रजेस मोठें सौख्य मिळत असे. त्याचे मागून त्याचा मुलगा संग राणा गादीवर बसला. हा गादीवर बसला तोंच सुखशिखरास जाऊन पोंचला. या राजापासून मेवाडचे राज्यास उतरती कळा लागली. त्या राज्यास अशी उतरती कळा लागली असतां त्यांत मधून मधून तारे चमकत, पण त्यांपासून फायदा न होतां उलटें अरिष्ट झालें.

संग राजाचें वैभव फार होतें. तो लढाईस निघाला ह्मणजे

जो याचा सरंजाम असे तो सांगितला ह्मणजे हें पूर्णपणें लक्षांत येईल. "८० हजार घोडे, ७ मोठमोठे राजे, १० राव, १००४ रावळ किंवा राव पदवी धारण करणारे सरदार, आणि ५०० लढाऊ हत्ती युद्धांत याचे बरोबर असत." अंबीर आणि मारवाडांत याचा मोठा मान असे, आणि "ग्वाल्हेर, अजमीर, शिकरी, रिजन, काल्पी, चंदेरी, बुंदी, गाग्रोन, रामपूर, आणि अबू येथील राव याचे मांडलिक होते व ते पाहिजे त्यावेळेस चाकरी करण्यास तयार असत." संगराणा हा मोठा राजकार्यधुरंधर पुरुष होऊन गेला. त्यानें प्रथमतः घरगुती कज्जे मिटवून सर्वांची एकी करून नंतर माळवा आणि दिल्ली येथून जे मुसलमान नेहमीं आपल्या राज्यांत स्वाऱ्या करीत त्यांस हाकून देऊन मुसलमानांचा १८ वेळ पराभव* केला. त्यांपैकीं बकरोळ आणि घाटोली या दोन ठिकाणच्या लढायांमध्यें प्रत्यक्ष बादशहा इब्राहीम लोदी हा संगराण्याशीं युद्धास आला. परंतु थोडक्याच दिवसानें बाबर यानें स्वारी केली त्यावेळेस हिंदुस्थान हें मुसलमानांचे ताब्यांत रहावें किंवा हिंदु राजांचे ताब्यांत रहावें याचा निकाल झाला नाहीं, पण प्रथम हिंदू लोकांचाच जय झाला.

* पूर्वी परशुरामानें १८ वेळ निःक्षत्रिय पृथ्वी केली होती त्याप्रमाणें या धैर्यशाली पुरुषानें आडदांड अशा मुसलमानांचा १८ वेळ पराभव करून शिवाय त्यांस हीनत्व आणणाऱ्या अशा अनेक गोष्टी केल्या. मुसलमान लोक रजपुतांचा केव्हांना केव्हां तरी पराभव करून त्यांस धुळीस मिळवूं अशी त्यावेळीं शेखी मिरवीत होते, परंतु याप्रमाणें १८ वेळ पराभव झाल्यामुळें त्यांची रग समूळ जिरली असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं !

इ० सन १५२७ च्या फेब्रुवारींत शिकरीजवळ 'कनुआ-ई' येथें ज्यावेळेस दोहों सैन्यांची गांठ पडली तेव्हां बाबरी लोकांस मोठ्या सैन्याची मदत असतांना हिंदु लोकांनीं मोठ्या शौर्यानें त्यास मागें हटविलें. या वेळेस जर सर्व सैन्याकरवीं संगराण्यानें त्यास अडवून धरिलें असतें तर संगराण्यास खरोखर जय मिळाला असता. नंतर आपलें सैन्य घेऊन लागलाच तो आपल्या ठिकाणीं गेला; यामुळें बाबरास पुष्कळ वेळ मिळाला आणि त्यानें पुनः आपले तळाचे भोंवतीं मोरचे लावून लढाई केली; यामुळें संगराण्याला मुसलमान लोकांस मागें हटविण्यास फार दुरापास्त झालें.

इ० सन १५२७ च्या १६ मार्च रोजीं एक मोठी लढाई झाली. बाबर आपल्या खंदकापासून बाहेर येऊन स्वतः सेनापतित्व स्वीकारून हिंदूवर हल्ला केला. पुष्कळ वेळ पर्यंत लढाई मोठ्या जोरानें चालली होती; यामुळें जय कोणाचा होतो, हें मुळीं कोणासच समजेना. तेव्हां 'सिली आदी' नांवाचा जो रणसिंह सरदार हिंदु सैन्याचा अधिपति होता त्यानें मुसलमानांस रस्ता दिला ह्मणून संगराण्यास युद्धांतून माघारें फिरावें लागलें. यावेळेस संगराण्यास शेंकडो जखमा व घाय लागले होते व त्याचप्रमाणें पुष्कळ मोठमोठे वीर रणांत पडून मृत्यु पावले. हा मेवाडचे टेंकडीजवळ आला; आणि "जय मिळविल्यावांचून चितोरास जाणार नाहीं" असा त्यानें निश्चय केला. जर तो पुढें कांहीं दिवस जगला असता तर त्यानें आपली प्रतिज्ञा खरी केली असती. परंतु ज्या वर्षीं त्याच

पराभव झाला त्याच वर्षी तो मेवाडच्या हद्दीवर 'बासा' ह्मणून एक ठिकाण आहे तेथें मृत्यु पावला. त्याला कोणी विष घातलें असें लोक ह्मणतात. याप्रमाणें सर्व जगांतील अत्यंत शूर अशा राजघराण्यापैकीं महा विख्यात आणि हिंदुस्थानांतील सर्व राजांमध्यें उत्तम महावीर असा जो संगराणा तो मृत्यु पावला. याच्या शरीराचा बांधा मध्यम होता, तरी पण त्याचें बल अप्रतिम होतें. वर्ण गोरा असून डोळे मोठे होते. संगराण्याचे वंशजांचे डोळेही बहुशा तसेच आढळतात. तो मृत्यु पावला त्या वेळेस त्याचे शरीरावर पुष्कळ वीरचिन्हें होतीं. त्याचा एक डोळा आपल्या भावाशीं युद्ध करीत असतां गेला होता व एक बाहू दिल्लीचा बादशाहा लोदी याजबरोबर युद्ध करीत असतां कापला होता. त्याचप्रमाणें दुसऱ्या एका लढाईत पांयास गोळी लागून लंगडा झाला होता. या शिवाय सर्व शरीरावर तरवारीच्या आणि भाल्यांच्या मिळून निरनिराळ्या ठिकाणीं ८० जखमा होत्या.

संगराण्याला लढाईमध्यें जाण्याची फार हौस असे. त्याचें धाडसही फार मोठें होतें. त्यानें मोठमोठीं धाडसाचीं कृत्यें केलीं आहेत; त्यांत माळव्याचा राजा मुसाफिर यास त्यानें मोठ्या हिकमतीनें धरलें होतें. त्याचप्रमाणें जनर्ल अल्लीचें मोठें पाठबळ असतां "रणथंबोरा"वर हल्ला करून नें त्यानें यश मिळविलें त्याबद्दल त्याची कीर्ति फार आहे. कन्यूया येथें यानें एक मोठा वाडा बांधून, त्यानें ती मारवाडची सीमा केली. संगराण्याप्रमाणें दूरदृष्टि आणि विचारी असा जर कोणी राजपुत्र पुढें गादीवर बसला असता तर बाबराच्या वंशजाला त्यानें हिंदुस्थानचा राजा कधींही होऊं दिलें नसतें.

इ० सन १५३० त संगराण्याचे मागून त्याचा वडील मुलगा रतनराणा गादीवर बसला. त्यानें ९ वर्षें राज्य केलें. परंतु इतक्या थोड्या अवकाशांत त्यानें पुष्कळ सुख भोगिलें. बाबर यानें त्याच्या मुलखांत कांहीं गडबड न करितां तो याचा मुलूख सोडून देऊन निघून गेला, त्यामुळें राण्यास पुष्कळ संतोष झाला.

इ०सन १५३९त रतन मृत्यु पावला व त्याचे मागून त्याचा बंधु विक्रमाजित् गादीवर बसला. हा मोठा साहसी, हट्टी, व शूर असा होता; परंतु त्यास अक्कल मुळींच नव्ह-ती. गुजराथचा राजा बहादर यानें त्याचा पराभव करून त्यास त्यानें चितूर येथें वेढिलें. त्या प्रख्यात राजधानींत पुष्कळ अघोर लढाया करून व तें हरण करून सर्व शहर लुटलें. परंतु पुढें बहादर याला हुमायुनानें युद्ध करण्या-साठीं बोलाविल्यावरून तो तिकडे गेला; तों इतक्यांत विक्रमादित्यानें आपली राजधानी पुनः परत घेतली. पण मग त्यानें आपल्या सरदारांस चांगलें वागविलें नाहीं ह्मणून पुन्हा बंड झालें व त्यांत त्याला पदभ्रष्ट करून ठार मारिलें, आणि संगराण्याच्या सख्या भावाचा मुलगा बनबीर यास गादीवर बसविलें.

‘ बनबीर यास संगराजाचा मुलगा स्वतः राज्य करण्यास योग्य होईपर्यंत गादीवर बसविलें आहे’ अशी त्यांनीं चोहोंकडे द्वाही फिरविली, व त्याचें नांव उदयसिंग असें ठेविलें. हा इ०सन १५४२ त गादीवर बसला. तो स्वतः अशक्त व

नादान असल्याकारणानें राज्याचा *उपभोग कोणी तरी दुसऱ्यानें घ्यावा असें ईश्वरानें त्याच्या कपाळीं लिहिलें होतें.

इ० सन १५६८ त अकबर बादशानें याच्या राज्यावर स्वारी करून हें शहर त्यानें आपल्या ताब्यांत घेतलें. लढाईच्याच कामांत हा मोठा भितरा होता असें नाहीं, तर रात्रीच्यावेळीं एखादेवेळेस जर कुत्रें मोठ्यानें ओरडलें तर तो एकदोघांस जवळ घेऊन व दिवाणखान्याचीं दारें बंद करून बसत असे. एक वेळ हा हवा घेण्याकरितां गच्चीवर बसला होता व ते दिवस पावसाळ्याचे होते, त्या संधीस एकदां मोठ्यानें विज कडकडली त्या भीतीनें हा घाबरून २ महिनेपर्यंत घरा बाहेर पडला नाहीं. इतका हा भित्रा पुरुष होता.

अकबर बादशाहाच्या शूरपणास भिऊन उदयसिंग हा राजपिपळ्याच्या अरण्यांत जाऊन लपून राहिला होता, आणि पुढें ४ वर्षांनीं राज्यभ्रंशजन्य दुःखांत मृत्यु पावला. हा फार भितरा होता, व ह्यावेळीं त्यास मंत्रीही चांगले नव्हते

---

* हल्लींही असे पुष्कळ राजे सांपडील. 'राजा' हें नांवाला भूषण लागल्यासारखें झालें आहे. परमेश्वरानेंच जर राज्यसुख यांच्या कपाळीं लिहिलें नसेल तर ते तरी कोठून भोगणार? त्यांनीं गोरक्यांची मर्जी संपादण्यांत काळ घालवावा आणि राज्यसुख निसऱ्यानेंच भोगावें. किंवा एकादा राजा तसाच पाणीदार व राज्य चालविण्यास योग्य असला, तर त्यास या गोरक्यांनीं वेडा ठरविण्याचा यत्न करावा, असा चमत्कारिक काळ हल्लीं आमच्या संस्थानिकांवर आला आहे. याचें आह्मांस फार वाईट वाटतें.

ह्मणून असें झालें. त्याचा मुलगा प्रतापराणा यानें प्राचीन राजांप्रमाणें राज्यसूत्रें मानेवर घेतलीं; परंतु त्याची राजधानी शत्रूनें हिसकावून घेतली होती यामुळें त्याजवळ पैसा नाहींसा झाला होता; आणि अत्यंत प्रतिकूळ काळ आल्यामुळें त्याचे सरदार व आप्तवर्गही निराश झाले होते; अशा सर्व गोष्टी प्रतिकूळ असतांही, आपलें धैर्य यत्किंचित् कमी न होऊं देतां, त्यानें कोमलमीर येथें आपलें ठाणें बसविलें आणि आपल्या जुन्या दुष्मानाशीं लढण्यास सर्व प्रकारें युक्तानें तयारी केली. त्यांत त्याला त्याचे आप्त, इष्टवर्ग, सरदार, व संस्थानिक यांनीं चांगला धीर दिल्यामुळें त्याचा पुष्कळ फायदा झाला.

राजपुतान्यांतील सर्व रजपुतांनीं मुसलमानांस मुली देऊं केल्या, परंतु यानें मात्र ती गोष्ट कबूल केली नाहीं. नीचत्व आणणाऱ्या गोष्टीस संमति न देतां तो त्यांच्याशीं टक्कर मारण्यास कबूल झाला. जोधपूरच्या महाराजाला ४ परगणे—१६,००,००० रुपये प्रत्येक वर्षीं वसूल होणारे असे—केवळ मुलगी देण्यास कबूल झाल्याबद्दल बादशाहानें दिले हें पाहून त्याला यत्किंचित्‌ही मोह उत्पन्न झाला नाहीं. सत्‌गुणाची चीज केव्हांना केव्हां तरी होतेंच. हळदी घांटाच्या मैदानावर अकबर बादशाहाचे मुलानें त्याचा पराभव करून पुष्कळ नाश केला व त्याचप्रमाणें पुष्कळ वेळ त्याला अपयश आलें तेव्हां त्याचे सरदार व रयत या सर्वांनीं मिळून मेवाड सोडून देऊन सिंधूच्या पलीकडे एका निराळ्या स्वतंत्र राज्याची स्थापना करावी असा निश्चय केला. पुढें त्याला आप-

त्या प्रधानाची अप्रतिम मदत मिळतांच तो आपला देश पुनः काबीज करण्यास निघाला तो एकदम आपल्या शत्रूंच्या आंगावर धांवून गेला, आणि एक निकराची लढाई करून त्यानें मोठ्या शूरत्वानें मेवाड, चितोर, अजमीर इत्यादि सर्व प्रांत आपले ताब्यांत घेतले. परंतु मंगळगड हें चितोरापासून लांब राहिल्या कारणानें, त्यानें आपल्या नांवानें उदेपूर नांवाची एक नवीन राजधानी स्थापन करून तें मोठें भरभराटीचें शहर केलें. तो इ०सन १५९७ त मृत्यु पावला.

या राजाचें, अप्रतिहत शौर्य, अचल धैर्य, आणि दृढनिश्चय ह्यांविषयीं फार कीर्ति आहे. याचे मागून उदेपूरच्या गादीवर वडील मुलगा अमरराणा बसला. ह्या राजाला स्वस्थता फार आवडे. आतां स्वस्थताप्रिय आणि योद्धे हे जरी भिन्न होते तरि पण यानें आपल्या कारकीर्दीत पुष्कळ पराक्रमाचीं कृत्यें केलीं. इ०सन १६०८ त त्यानें बादशाहाच्या सैन्याचा पराभव केला, ह्मणून जहांगीर यानें त्याचा सूड घेण्यासाठीं, चितुरसुग्रा या नांवाचा राणा अमरचा चुलता, यास अमरचा घात करण्यास सांगितलें होतें; व त्याप्रमाणें करण्यास तो तयारही होता.

हा चुलता आपले घराण्यापासून विभक्त झाला होता. परंतु असें करण्यापासून त्यास कांहीं फायदा वाटेना; कारण सुग्रा यानें विषयसुखांत निमग्न होऊन सात वर्षेंपर्यंत राज्य केलें. या ७ वर्षांत एक रजपुत सरदारही त्याला मिळाला नाहीं, यामुळें त्याच्याच मनाला वाईट वाटून चितोर शहर त्याच्या योग्य वारसाच्या स्वाधी-

न केलें. या किल्याच्या योगानें या राण्यानें मेवाडचे ८० वर किल्ले आपलेकडे घेतले. या पुढें मात्र त्याच्या परीक्षेची वेळ जवळ येऊन पोंचली.

राजपुत्र खुर्म ज्याला पुढें शहाजहान बादशाहा ह्मणत—तो हिंदुस्थानावर स्वारी करण्याच्या बेतांत होता ह्मणून तो पुनः सर्व सैन्य वगैरे जमा करून बादशाहाशीं टक्कर देण्यास उभा राहिला परंतु त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं.

मोंगल लोक एकामागून एक स्वाऱ्या करूं लागले, त्यांनीं त्याचे शहरास वेढे घातले व जमिनी उध्वस्त केल्या; असें पाहून राणा तहास कबूल झाला. यापुढें जें वर्तमान झालें तें जहांगिरानें स्वतः लिहून ठेविलें आहे. "रविवारीं राणा आपल्या लवाजम्यानिशीं आमच्या इतर संस्थानिकांप्रमाणें माझ्या मुलाच्या भेटीस येऊन मोठ्या आदबीनें जवळ बसला. राण्यानें माझ्या मुलास एक उत्तम हिरा आणि कांहीं रत्नखचित हत्यारें नजर केलीं. त्याचप्रमाणें सात मोठ्या किंमतीचे हत्ती व ९ घोडे नजर केले. माझ्या मुलानेंही राण्याचा बहुमान केला. नंतर राण्यानें गुडघे टेकून आपल्या अपराधांची क्षमा मागितली आणि माझ्या मुलानें मान हालवून त्याला अभयवचन दिलें. नंतर, तुझें सर्व प्रकारें चांगलें संरक्षण करूं असें बोलून त्याला उत्तम चिलखतें, हत्ती, घोडे, आणि एक तरवार अशा जिनसा नजर केल्या आणि कांहीं गांवही बक्षिस * दिले."

* पूर्वींची रीत अशीकडे याचप्रमाणें होती. कोणी कोणास

शहाजहान हा राण्यास मोठ्या उदारपणानें वागवीत असे. त्याने त्याचा अकबरापासून जिंकलेला मुलूख त्याचे स्वाधीन करून त्याचा मुलगा कर्ण यास आपल्या राज्यांतील लष्करी खात्यात मोठी जागा दिली. इतकें केलें तरी पराजयरूप अपमानशल्य राणा अमर याचे मनांतून जाईना. त्यानें आपला मुलगा कर्ण यास गादीवर बसविलें, आणि आपण सर्व राज्यसुखाचा त्याग करून उदेपूरच्या बाहेर १ मैलावर वाडा होता तेथें जो एकदां जाऊन राहिला तो नंतर त्या वाड्याच्या दरवाज्याच्या बाहेर सुद्धां आला नाहीं. त्याच्या मनांत अपमानशल्य अगदीं भिनून गेलें होतें. महात्मे पुरुष असतात त्यांचा यत्किंचित् जरी अपमान* झाला तरी ते लोकांस तोंड

---

कांहीं दिल्यास त्याचा उपयोग पिढ्यानपिढी होत असे. नाहीं तर आमच्या इंग्रज सरकारचें हल्लीचें बक्षीस. हे राजे कधीं उदार होऊन कोणास कांहीं देणार नाहीत; व कदाचित् दिल्यास त्याचा त्याला सुद्धां कधीं उपयोग होत नाहीं. एखाद्यावेळीं दारिद्र्य आल्यास या बक्षिसापासून एक दिडकाही मिळण्याची कठीण. हे राजे दोन तीन अक्षराच्या पदव्या देऊन लोकांस संतुष्ट करतात व लोकही या असल्या फुकाच्या बक्षिसाकरितां हजारों रुपये खर्च करून त्यांचे दासानुदास होऊन जातात व रयतेस नागवितात. हें फार वाईट आहे.

* पूर्वीचे लोक फार अभिमानी होते. नाहीं तर हल्लींचेही लोक पहा. भरसभेंत एका खुर्चीवरून उठवून दुसऱ्या खुर्चीवर बसवितात व शेवटीं वेळ पडल्यास बाहेरही घालवितात, तरी या लोकास मानहानि झालीशी वाटत नाहीं. साहेब लोकांच्या बंगल्यावर भेटण्यास गेले असतां एखादेवेळेस यास बड्या गोरकाय गृहस्थाकडून अपशब्दही सोसून घ्यावे लागतात. असा प्रकार हल्लीं चालू आहे. या मासल्याचें ताजें उदाहरण बा. २१

दाखवीत नाहींत. त्याप्रमाणेंच महा क्षत्रियकुलोद्भव उदेपुरच्या अमर राण्यास वाटावें व त्यानें राज्यसुखाचा त्याग करून अरण्यांत रहावें हें साहजिक होय. मनुष्यास अपमानाची शरम असावी. ज्यास मानापमान नाहीं ते निवळ पशू सारखे होत.

इ० सन १६२१ त राणा कर्ण हा आपले पूर्वजांचे गादीवर बसला. यानें प्रजेचें पालन चांगल्या रीतीनें केलें. खुर्म यानें आपला बाप जहांगीर याशीं राज्यलोभानें बंड केलें त्या बंडांत कर्ण राणा खुर्माच्या पक्षाकडे होता. त्यानें त्यास उदेपुरास आश्रय दिला होता. खुर्म यानें राणा कर्ण याचे बापास त्याचे अपराधांची क्षमा करून त्याचें कल्याण केलें; तें स्मरून राणा कर्ण यानें खुर्मास कृतज्ञतापूर्वक मदत केली. यामुळें त्याच्यावर जाहांगीर फारच रागावला होता.

इ० सन १६२८त राणा कर्ण मृत्यु पावला.त्याच्या मागून त्याचा मुलगा जगसिंग हा गादीवर बसला. जहांगीर बादशाहानें जगसिंगाविषयीं असें लिहिलें आहे कीं " मीं त्याला बाराव्या वर्षी पाहिलें, तेव्हांच हा मोठा शूर होईल

माहे अक्टोबर सन १८८७ इसवीस नामदार गव्हर्नर साहेबांची स्वारी सांगली संस्थानीं गेली होती. त्यावेळीं सांगलीकर हे स्वतः नामदार गव्हरनर साहेबांस आणण्याकरितां घोड्याच्या गाडींत बसून जात असतां, त्यांस गाडींतून खालीं उतरवून तेथील जाइंट आडमिनिस्ट्रेटर क्यापटन रे हे बसून पुढें गेले. आमच्या राजे लोकांस या गोऱ्यायांनीं कसेंही वागविलें तरी चालतें. तुह्मीं आह्मांस पाहिजे तसें कां वागवितां असें त्यांस विचारणारा शूर पुरुष आमच्या हिंदुस्थानांत कोणीच नसावा काय?

असें त्याच्या चेहेऱ्यावरून दिसे." यानें २६ वर्षे राज्य केलें. त्याचे राज्यांत जिकडे तिकडे शांतता होती. त्याच्या नांवाच्या उदेपुरास स्वतः बांधलेल्या मोठमोठ्या पुष्कळ इमारती अद्याप आहेत.

इ० सन १६५४त त्याचा मुलगा राणा राजसिंग हा गादीवर बसला. त्यानें रजपूत राजघराण्यांतील एका चांगल्या मुलीशीं लग्न लाविलें. त्या मुलीस औरंगजेबानें मागणें केलें होतें. ह्मणून त्या मुलीनें राणा राजसिंग यास असें सांगून पाठविलें कीं "हंसीचा विवाह बगळ्याशीं व्हावा हें तुह्मां शूर रजपूत वीरांस योग्य दिसतें काय? अस्सल रजपूतकुलोत्पन्न कन्येचा विवाह यवनाशीं व्हावा हें तुह्मांस चांगलें वाटतें काय? आपण मोठे देशाभिमानी, कुलीन, शूर व क्षत्रिय आहांत, तर आपण याचा चांगला विचार करावा." हा निरोप ऐकून तो इतका संतप्त झाला कीं बादशाहानें राजपुत्रीस आणण्यासाठीं जे लोक पाठविले होते त्यांच्यावर राजसिंगानें हल्ला करून त्यांस ठार मारिलें आणि "त्या मुलीस आणून तिजबरोबर स्वतः लग्न लाविलें." ह्या कारणावरून औरंगजेबाचें व त्याचें युद्ध व्हावयाचें होतेंच; परंतु पुनः याशीं युद्ध करण्यास याहीपेक्षां एक मोठें कारण झालें. तें असें.

इ० सन १६७६ त धर्मवेड्या औरंगजेबाच्या मनांत झिझिया नांवाचा कर पुनः बसवावा अशी लहर आली होती. ज्या लोकांचा महंमदी धर्मावर विश्वास नाहीं त्यांना या धर्मभोळेपणाच्या कृत्यामुळें मुसलमानांचा फार राग आला. विशेषतः उदेपूरच्या राण्यास तें फार लागलें. राण्यानें

त्याच वेळेस मोठ्या शहाणपणानें बादशाहास एक पत्र लिहून पाठविलें. तें पत्र फार विचार करण्यासारखें होतें.

या पत्रामुळें औरंगजेबाचा क्रोधाग्नि अधिकच पेटला. त्यानें आपले सर्व मांडलिक संस्थानिक आणि आप्त वगैरे जमा करून उदेपुरावर धाड घातली. परंतु राणा राजसिंग हा बादशाहाच्या वीरांस पुरून उरण्यासारखा होता. बादशाहाचे स्वारांनीं आपणावर चाल केली असें पाहून राण्यानें आपण मागें हटलोंसें दाखविण्यासाठीं पुष्कळ मागें सरला, आणि त्यांस हळू हळू आपल्या आटो-क्यांत आणून मग एकदम त्यांच्यावर तुटून पडला. या लढाईंत पुनः एक वार मोठा जय मिळाल्यावर त्यानें औरंगजेबास आपल्या मुलखांतून बाहेर काढून लाविलें आणि मुसलमानांच्या राज्यावर स्वारी केली.

इ०सन १६८१ त त्याच्या मुलानें त्यास, आपण स्वरा-ज्याच्या संरक्षणासाठीं केलेल्या मेहनतीचें फळ मी उत्तम भोगीन असें सांगितल्यावर, राणा राजसिंग मृत्यु पावला. तो मोठा रणशूर, वीर्यशाली, गरीबांचा आश्रयदाता, व जे जे गुण शूरास असावे ते ते गुण ह्या राजाच्या आंगीं होते. त्यानंतर जयसिंगराणा गादीवर बसला. यानें औरंग-जेबाशीं मी जास्ती कर बसविणार नाहीं असा तह करून, त्यावर सही करविली. लहानपणीं जयसिंग मोठा पाणी-दार आणि उमदा असे, पण जसजसा तो मोठा होत चा-लला तसतसा आळशी आणि विषयी असा निघाला. याच्या कारकीर्दींत घरगुती तंटे फार माजले.

इ०सन १७०० त जयसिंग मृत्यु पावला.यानें कोणतें-

ही महत्वाचें काम केलें नाहीं. त्याच्या मागून त्याचा मुलगा अमर गादीवर बसला. त्यानें आपल्या बापाविरुद्ध बंड केलें होतें. दुसऱ्या अमरानें १६ वर्षें राज्य केलें. त्याचे राज्यांत सर्व रजपूत राजांनीं एक होऊन मुसलमान लोकांपासून आपला बचाव करण्यासाठीं एकमत केलें. या एकमतांत पुष्कळ ठरावांच्या योगानें आपआपसांत तंटे होण्याची वेळ येऊन पोंचली व रजपूत राजांचीं आपआपसांत भांडणें सुरूही झालीं. तेव्हां अर्थात् मुसलमानांनीं मध्यें पडून आपलें कार्य साधून घेतलें. इ० सन १७१६ त अमर मृत्यु पावला. यानें सुद्धां कोणतेंही महत्वाचें काम केलें नाहीं. याच्यावेळीं तर आपसांत पुष्कळच तंटे सुरू झाले होते.

अमरानंतर राणा संग्रामसिंग गादीवर बसला. यानें इ० सन १७३४ पर्यंत राज्य केलें. याच्या कारकीर्दींत मेवाड देशाचा खूप दरारा असे. पाठीमागच्या राजांच्या कारकीर्दींत जो मुलूख गेला होता, तो यानें पुनः स्वपराक्रमानें मिळविला. हा शहाणा, मुत्सद्दी, स्थिरचित्त, राजकार्यधुरंधर असा होता. वसूलाच्या कामांत त्याची लोक फार वाहवा करितात. हा रयतेला फार प्रिय असा होता. बेहारीदास पंचोली ह्मणून एक अप्रतिम सचिव होता त्यामुळें या राजास फार सुख झालें. राणा संग्रामसिंगानंतर त्याचा मुलगा राणा जगत्सिंग हा गादीवर बसला. यानें पूर्वीं सर्व रजपूत राजांनीं केलेल्या ऐकमत्त त्याचें पुनः पुनर्जीवन केलें. यानेंही राजकार्याकडे दुर्लक्ष करून सर्व वेळ चैनींत घालविला. हा नेहेमीं हत्तींच्या लढाया व लावण्यांच्या नादांत

असल्यानें राज्यकारभाराकडे मुळींच पाहात नसे. यामुळें याचे राज्यास लवकरच उतरती कळा लागली. रजपूत राजे याचा फार हेवा करीत, ह्यामुळें याचें आणि इतर रजपूतांचें ऐक्य होइना. पुढें लवकरच मराठे प्रबळ झाले, व त्यांचा दरारा वाढत चालला, अशा वेळेस यानें आपल्या जातींतील शूर अशा रजपूत लोकांचा आश्रय न घेतां आपले घरचे तंटे मिटविण्यासाठीं मल्हारराव होळकरास आणिलें. या कारणामुळें मल्हाररावास राजपुतान्यांत पाहिजे तसा हात घालण्यास फावलें.

इ० सन १७५२ त राणा जगत्‌सिंग मृत्यु पाल्यावर तें संस्थान मराठ्याचे राज्याखालीं आलें. याचे मागून राणा प्रतापसिंग हा गादीवर बसला. यानें ३ वर्षं राज्य केलें. हा राज्य करीत असतां मराठ्यांचे सरदार सटवाजी, जनकोजी, व रघुनाथराव यांच्या उदेपुरावर एकामागून एक सारख्या स्वाऱ्या चालल्या होत्या. हा अगदींच नालायक होता. नंतर दुसरा राजसिंग राणा इ० सन १७५६ त गादीवर बसला. यानें ७ वर्षं राज्य केलें. एवढ्या अवकाशांत याचें राज्य मराठ्यांच्या स्वाऱ्या, त्यांचे कर वगैरेच्या योगानें इतकें निर्धन होऊन गेले होतें कीं, राण्यास राठोडच्या राण्याच्या मुलीशीं लग्न लावावयाचें होतें ह्मणून त्याला लग्नखर्चासाठीं राज्याचा वसूल पाहाणाऱ्या एका ब्राह्मणास मला पैशाची* मदत करा असें ह्मणावें लागलें.

*हल्लींही त्यावेळच्या स्थितीप्रमाणेंच राजे लोकांची व रयतेची स्थिति आहे. खजिन्यांत नोकर लोकांचा पगार देण्यापुरती सुद्धां शिलक नसते, आणि एखादा गोरा अमलदार यांच्या राज्यांत

इ० सन १७६२ त त्याच्या मागून त्याचा चुलता राणा अर्सी हा गादीवर बसला. हा मोठा रागीट असून आपल्या हाताखालच्या मोठमोठ्या सरदारांस फार निंद्य रीतीनें वागवी. तेणेंकरून त्यावर मोठमोठीं संकटें आलीं. पुढें त्याच्या सरदारांनीं बंड केलें आणि एक तोतया उभा करून त्याला राजा केला.

शिंदे, होळकर, आणि जोधपुरचे राजे यांनीं याप्रमाणें उदेपूरच्या राज्यांत घोटाळा व अव्यवस्थितपणा पाहून आपलें कार्य साधून घेतलें. दहा वर्षांच्या आंत राणा अर्सी याचे मोठे मूल्यवान् असे ६ मुलूख गेले, आणि लढायांचा अतोनात खर्च त्याचे आंगावर बसला. या वेळेस अमरचंद नांवाचा एक व्यापारी होता, त्यानें, अशा प्रसंगीं मोठ्या धैर्यानें आणि साहसानें राजास फार साहाय्य केल्यामुळें या तोतयाची फजिती उडाली. परंतु यानें या कार्यांत क्रूरपणा व अनौदार्य फार दाखविलें यामुळें एका मारेकऱ्यानें त्यास भाला खोंचून ठार मारिलें.

---

आला कीं पुरे, कसेंही करून हजार बाराशें रुपये कर्ज काढून तो दिवस साजरा करितात. याचें उदाहरण आमच्याइकडे दक्षिण-महाराष्ट्रांत पटवर्धनांच्या संस्थानांत पुष्कळ मिळेल. माळव्यांत देवास ह्मणून एक लहानसें संस्थान आहे तेथें खजिन्यांत शिलक नसल्यानें नोकर लोकांचे पगार ६।६ महिन्यांचे तुंबून राहतात तरी दाद नाहीं. स्वतःची चैनबाजी व युरोपियन लोकांची मर्जी संपादण्यांत कितीही रक्कम खर्च झाली तरी त्याची त्यांना काळजी नाहीं. यापासून त्यांच्या प्रजेस पैचाही फायदा नसतो; उलटा त्यांस खर्चच असतो. तर अशा व्यर्थ खर्चांपेक्षां कांहीं उपयोगाचें कृत्य जर हे राजे लोक करितील तर त्यापासून त्यांस व त्यांच्या प्रजेस पुष्कळ प्रकारचें सुख होणार आहे.

इ० सन १७७२ त राणा अर्शी मारला गेल्यावर त्याचे मागून त्याचा मुलगा राणा हमीर हा गादीवर बसला. यासही बापाप्रमाणें अनेक संकटें व दुःखें भोगावीं लागलीं. याचे राज्यांत मेवाडच्या विपत्तीस पारावार नव्हता असें ह्मटलें असतां चालेल. राज्यांत जिकडे तिकडे लढाया चालल्या होत्या. एकामागून एक नवीन बंडें उद्भवत, हीं सर्व बंडें त्याचा प्रधान अमरचंद याचे कारकीर्दींत अगदीं बंद पडलीं. हा फार खर्चिक होता. उदेपूरचा राज्यकारभार करीत असतां तो मृत्यु पावला, तेव्हां त्याचे और्ध्वदेहिक क्रियेपुरता सुद्धां त्याचे जवळ पैसा राहिला नव्हता. त्याची कीर्ति अजूनपर्यंत सर्व मेवाडांत गातात. अमरचंद मरतांच पुनः उदेपुरास पूर्वीपेक्षां फार घोटाळा सुरू झाला; आणि उदेपूरच्या राजाचे आणखी ६ प्रांत दुसऱ्या राजांनीं बळकाविले. पुढें राजाही लवकरच मृत्यु पावला.

इ० स० १७७८ त त्याचा भाऊ भीमसिंग हा गादीवर बसला. त्यानें ५० वर्षे राज्य केलें. यानें जशा विपत्ति भोगल्या तशा पूर्वी कोणत्याही राजानें भोगिल्या नसतील. हा राज्यावर बसल्या दिवसापासून तों इंग्लिश आणि मराठे यांची लढाई सुरू होई तोंपर्यंत, त्याच्या पूर्वीच्या राजांचे वेळेस जशी राज्यांत बंडाळी माजली होती तशीच याचे कारकीर्दींत सुरू होती. कधीं कधीं विपत्तीमागून थोडीशी सुखाची चमक दृष्टीस पडे; परंतु या सुखाचें मान फारच थोडें होतें.

१९ व्या शतकाच्या आरंभीं लार्ड लेक आणि वेलस्ली या दोघांनीं जेव्हां मराठे सरदारांस बरेंच जेरीस

आणिलें तेव्हां उदेपुरास थोडेंसें सौख्य होईलसें वाटलें होतें; परंतु तसें न होतां उलटें वाईट झालें. गव्हर्नर जनरल लार्ड कार्नवालीस यानें नेटिव राजांच्या तंट्यांत हात घालणार नाहीं असा निश्चय केला होता. यामुळें पुढें राजपुतान्यांत शिंदे, होळकर, अमीरखान, आणि पेंढारी यांनीं एकामागून एक स्वाऱ्या सुरू केल्या व लुटालूट करून सर्व मुलूख उध्वस्त करून टाकिला.

राण्याची इतकी दुःखकारक आणि परतंत्र अवस्था झाली होती कीं, सर्व हिंदु राजघराण्यांतील अग्रगण्य असा जो हा क्षत्रियकुलावतंस राजा, याला कोटचा रक्षक जो झेलिमसिंग त्याजपाशीं "प्रत्येक महिन्याचा खर्च करण्यास मला हजार रुपये महिना द्यावे" ह्मणून विनंती करणें भाग पडलें. अशी राजाची वाईट अवस्था पाहून त्याचे सरदार, मानकरी व संस्थानिक हे त्याची फार अवहेलना करूं लागले.

सरदारांपैकीं जे मोठमोठे सरदार होते त्यांपैकीं कांहीं आपआपल्या किल्यावर जाऊन बसले आणि स्वराज्याच्या रक्षणासाठीं अगदीं खटपट न करितां,. केवळ स्वरक्षणासाठीं सर्व कांहीं करण्यास उद्युक्त झाले.

इ० सन १८१७ त पेंढाऱ्यांचा दंगा संपे तोंपर्यंत ही स्थिति अशीच चालली होती. तात्पर्य, ज्या वेळेस इंग्रज सरकार आपल्या सैन्यानिशीं मेवाडांत गेलें त्या वेळेस तो मुलूख उध्वस्त केलेला होता. मोठमोठ्या सुंदर शहरांची राखरागोळी होऊन गेली होती. जिकडे तिकडे बेबंदशाही माजली. राजास कोणी जुमानीत नव्हते व राज्यांत फार अव्यवस्था झाली होती.

ब्रिटिश सरकारानें उदेपूरच्या राण्यास असें सांगितलें कीं, आह्मी तुमच्या राज्यांतील सर्व घोटाळा मोडून टाकून तुमच्या राज्याची उत्तम व्यवस्था लावून देतों. असें आश्वासन त्यांनीं त्यास दिलें. नंतर इंग्रज सरकारानें सरदार लोकांना एकत्र बोलावून आणून, तुह्मीं राजाशीं विश्वासानें वागून राण्याचे जे प्रांत घेतले असतील ते त्यास परत द्यावेत, आणि आह्मी स्वतः तुमचें सर्वांचें प्रजावत् पालन करून सर्वांच्या हक्कांचें रक्षण करूं ह्मणून सांगितलें. आतां इंग्रज सरकारासंबंधीं पाहिलें तर राण्यानें त्यांचें सार्वभौमत्व कबूल केलें, राजकीय संबंधाचा तुमच्या संमतीवांचून कोणाशीं पत्रव्यवहार करणार नाहीं ह्मणून सांगितलें, जे सर्व कांहीं आपले राज्यांतील सरदारांचे तंटे बखेडे वगैरे असतील ते सर्व इंग्रजांस मध्यस्थी घालून त्यांच्यावर सोंपविण्याचें कबूल केलें, आणि ५ वर्षांच्या खंडणीबद्दल १ वर्षाच्या वसुलाचा चौथा हिस्सा सध्यां व पुढें नेहमीं देण्याचें कबूल केलें. याप्रमाणें तह झाला.

हा तह झाल्यानंतर इ० सन १८१७ त मराठ्यांचे घोडेस्वार व लुटारू लोकांच्या दुसऱ्या सर्व टोळ्या मुलखांतून हाकून दिल्या व राज्यांतील अव्यवस्था नाहींशी केली. पुढें इंग्रजांनीं आपल्या तर्फे तेथील व्यवस्था पाहण्याकरितां एक युरोपियन कामगार नेमिला. या कामगारानें राज्यांत पुष्कळ प्रकारच्या सुधारणा केल्या. त्यांच्या योगानें ५ वर्षांत तेथील लोकांस चांगलें सुख होऊन, सरकारी वसुलाचें उत्पन्नही दुप्पट वाढलें. याप्रमाणें सर्व व्यवस्था झाल्यानंतर इंग्रज सरकारच्या हुकुमाव-

रून या कामगारानें सर्व राज्यकारभार उदेपूरच्या राजाच्या ताब्यांत दिला. याप्रमाणें जरी सर्व राज्यकारभार राण्याच्या हातीं आला तरी तो नीट रीतीनें चालविण्याच्या कामीं उदेपूरच्या कामगारांस यावें तसें यश आलें नाहीं. कारण कारभार हातीं आल्याला दोन वर्षें झालीं नाहींत तोंच, राजाला कर्ज फार झालें, वसूलाची बाकी तुंबली, व इंग्रज सरकारची खंडणी चुकवून दिली नाहीं, आणि एकंदरींत पुनः पहिल्यासारखीच अव्यवस्था माजली. तेव्हां पुन्हा इंग्रज सरकारानें राजाच्या मोठमोठ्या अधिकाऱ्यांमध्यें फेरफार करून सर्व घोटाळा नाहींसा केला व सर्व प्रकारें उत्तम व्यवस्था केली. नंतर एक नेटिव कामगार नेमून त्याच्याकडे सर्व राज्याचा अधिकार दिला.

इ० सन १८२६ त पुनः दुर्दैवानें या कामगारासही अपयश येऊन त्या राज्यांत सर्वत्र अव्यवस्था माजली, वसूल फार कमी होऊं लागला, व उधळपट्टी आणि जुलूम इतक्या शिखरास जाऊन पोंचला कीं, प्रजेस दे माय धरणीठाय होऊन रस्त्यांतून गांवांत फिरण्याची सुद्धां भीति वाटूं लागली व या गांवाहून त्या गांवांस जाणें झालें तर मार्गांत निर्भयता नसल्यामुळें व्यापार व रस्ते बंद पडले.

पुढें इ० सन १८२८ त भीमसिंग मृत्यु पावला आणि त्याचा मुलगा जवानसिंग हा गादीवर बसला. त्यास राज्यकारभारा संबंधीं मिळावें तसें चांगलें शिक्षण मिळालें नव्हतें यामुळें त्याच्या आंगीं पुष्कळ प्रकारचीं दुर्व्यसनें जडलीं. तेव्हां अशा दुर्व्यसनी राजाच्या अमलांत राज्याची भरभराट व प्रजेस सुख कितीसें होणार हें उघड दिसतच आहे.

राजा गादीवर बसून कांहीं वर्षें लोटलीं नाहींत तोंच ईंग्रज सरकारच्या खंडणीची बाकी फार चढली, संस्थानास कर्ज अतोनात झालें आणि प्रति वर्षास दोन लक्ष रुपयांची खजिन्यांत तूट पडूं लागली. याप्रमाणें राज्यांत अव्यवस्था सुरू झाल्यामुळें शेवटीं ईंग्रज सरकार मध्यें पडल्याशिवाय उदेपूरच्या राजाची धडगत नाहीं अशी इ० सन १८३८ त जवानसिंगास ईंग्रज सरकारानें राज्यप्रकरणीं सूचना केली. त्याच वर्षीं राणा मृत्यु पावला. त्याला औरस संतती नव्हती ह्मणून राणा सरदारसिंग या नांवाचा एक मुलगा दत्तक घेऊन त्यास गादीवर बसविलें. हा फार त्रास आणि स्वभावानें रागीट असल्यामुळें आपल्या सरदारांस फार अप्रिय झाला होता. यानें आपल्या कारकीर्दींत कोणतेंही महत्वाचें काम केलें नाहीं. हा इ० सन १८४२ त मृत्यु पावला. याचे अमदानींत पूर्वींपासून जी वसुलाची बंडाळी होऊन गेली होती, ती तशीच चालू राहिली होती. यामुळें पुढें फार त्रास पडला.

त्याच्या मागून त्याचा धाकटा भाऊ राणा सुरूपसिंग हा गादीवर बसला. याच्या वेळेस संस्थानास पूर्वीं जें कर्ज वगैरे होऊन फार नासाडी झाली होती, तींतून संस्थानास मुक्त करावें ह्मणून ब्रिटिश सरकारानें उदेपूर संस्थानाकडून जी वार्षिक खंडणी येत असे त्या खंडणीपैकीं २ लाख रुपये कमी केले. याच्या राज्यांत याचे आणि मांडलिकांचे तंटे एकसारखे चालले होते. कारण यांपैकीं पुष्कळ मांडलिक पूर्वींच्या राण्याचे वंशज होते, यामुळें त्यांना जे पुष्कळसे स्वतंत्र अधिकार असत, त्यांचें आकुंचन

करून त्यांस आपल्या कह्यांत आणण्याचा या राजाचा बेत होता. इ० सन १८६१ त या सर्व तंट्यांचा निकाल लागला व त्याच वर्षी राणा सुरूपसिंग मृत्यु पावला. त्याचे मागून त्याचा पुतण्या शंभूसिंग हा गादीवर बसला. हा गादीवर बसल्यानंतर राज्यकारभार प्रथम पोलिटिकल एजंटच्या विचारानें रिजन्सी मार्फत चालला होता, परंतु पुढें रिजन्सीचे सभासद फार अयोग्य वर्तन करूं लागले, व मोठमोठ्या क्रूरकर्मांकडे त्यांचें दुर्लक्ष्य होऊन अपराध्यांस शिक्षा मिळेनाशा झाल्या, आणि पोलिटिकल एजंटाच्या मनाप्रमाणें कोणी संमति न देतां त्याच्या विरुद्ध फार जाऊं लागले, ह्मणून ती रिजन्सी मोडून टाकून त्याबद्दल दुसरें कौन्सिल नेमावें व सगळा राज्यकारभार एक नवा रिजंट नेमून त्याचे स्वाधीन केल्याशिवाय दुसरा उपाय नाहींसा झाला. परंतु अशा प्रकारें राज्यकारभार करण्यास कोणी लायक सरदार न मिळाल्या कारणानें ३ सभासद व एक अध्यक्ष यांचें कौन्सिल करावें असें ठरलें. या ठरावाप्रमाणें ज्या गृहस्थास मुख्य अध्यक्ष नेमिलें होतें त्यानें बाकीच्या लोकांचा कांहींएक विचार न घेतां स्वतःच मनास वाटेल तसा अधिकार चालू केला, यामुळें हाही बेत रहित करून पोलिटिकल एजंट व दुसरे दोन सभासद नेमून त्यांचे हातांत सर्व राज्यकारभार सोंपवून दिला. यामुळें प्रजेस पुष्कळ प्रकारचें सौख्य मिळालें.

राण्यास त्याच्या राज्याच्या कामाची माहिती करून देण्यासाठीं व त्यास राज्यकारभारात तरबेज करण्यासाठीं त्यास दरबारांत नेहमीं जवळ बसवून सर्व राज्यकारभाराची चांगली

माहिती करून द्यावी असें ठरविलें होतें. अशी तजवीज केल्यानंतर पुढें लवकरच वसूलाच्या वगैरे संबंधाची पूर्वीची सर्व अव्यवस्था नाहींशी होऊन उत्पन्न पुष्कळ वाढलें व राज्यकारभारही सुरळीत रीतीनें चालला आणि पूर्वींचे दंगेधोपे वगैरे सर्व मोडले.

इ० सन १८६९ त ता. १७ नवंबर रोजीं राणा शंभूसिंग हे वयांत आल्यावर त्यांनीं आपला राज्यकारभार आपल्या हातांत घेतला. परंतु हा राणा रयतेस प्रिय नव्हता. यास मूलबाळ कांहींएक नव्हतें व यानें कोणचेंही महत्वाचें काम केलें नाहीं. हा ज्यावेळेस मरणोन्मुख झाला, त्यावेळेस त्याणें आपल्या वडील चुलत्याचा मुलगा सुर्जनसिंग*यास दत्तक घेतलें. या कामांत त्यास दुसऱ्या दोघां चुलत्यांचे हक्क रद्द करावे लागले. हा ता० ७ अक्टोबर इ० सन १८७४ त मृत्यु पावला. त्यावेळेस त्याचें वय १९ वर्षांचें होतें. सुर्जनसिंग यास दत्तक घेतलें त्यावेळेस त्याचें वय १६ वर्षांचें होतें. हे वयांत आल्यावर त्यांस त्याच्या राजाचा सर्व अधिकार दिला. यांचें बहुतेक लक्ष ब्रिटिश सरकारची मर्जी संभाळण्याकडे आहे. कोणत्याही कामास पैसे खर्च करणें झाल्यास हे बहुधा युरोपियन लोकांच्या कामांकडे फार करितात, व तोही परदेशांत आणि आपल्या राज्याच्या ऐपतीकडे न पाहातां उधळपट्टीनें फारकरून होतो.

हे जर आपल्या संस्थानांत कांहीं पैसे खर्च करून सार्वजनिक कृत्यें करितील तर त्यांपासून रयतेस विशेष सौख्य होऊन यांचें हें करणें फारच प्रशंसनीय होईल. यांनीं

* हेच सांप्रत गादीवर आहेत.

"लेडी डफरिन" फंडास दहा हजार रुपये दिले आहेत. हेच रुपये जर त्यांनीं आपल्या रयतेच्या उपयोगीं पडेल असें एकादें कृत्य करण्यांत खर्च केले असते तर केवढा बरें फायदा झाला असता? असो. आमच्या हिंदुस्थानचें नष्टचर्य ज्यावेळेस संपेल त्याच वेळेस आमच्या राजे लोकांस हिंदुस्थानच्या -निदान स्वकीय रयत-लोकांकरितां कांहीं पैसा खर्च करण्याची सुबुद्धि झाली तर होईल. तेथपर्यंत जें होईल तें पाहात स्वस्थ राहिलें पाहिजे. यांस इंग्रज सरकाराकडून १७ तोफांची सलामी होती ती इ०सन १८८७ पासून १९ तोफांची सलामी मिळूं लागली आहे. यांना दत्तकाचा अधिकार आहे. हल्लीं राज्यकारभार बऱ्या प्रकारें चालत आहे.

**प्रकरण पहिलें समाप्त.**

---

## प्रकरण दुसरें.

# जयपूर.

या संस्थानाचें क्षेत्रफळ १५,००० चौरसमैल आहे; लोकसंख्या १९,००,००० आहे; आणि वसूल ३६,००,००० रुपये आहे.

जयपूरच्या राज्यास अंबर अथवा धुधारांचें राज्य असें ह्मणतात. याची स्थापना इ० सन ९५७ त धोलराय यानें केली. धोलराय हा नलराजापासून ३४ वा पुरुष होय. या नलराजानें "नरपार" शहराची स्थापना केली असें ह्मणतात. नलराजा हा साक्षात् कुशाच्या वंशांतील होय. कुश ह्मणजे कौशल देशाचा राजा जो रामचंद्र त्याचा

दुसरा मुलगा होय. त्या रामचंद्राची राजधानी अयोध्या तिला हल्लीं औंद असें ह्मणतात. धोलरायाच्या पराक्रमांचें वर्णन प्राचीन ऐतिहासिक काव्यांमधून फार आढळतें. त्यांवरून त्यानें आपल्या पूर्वजांचा देश जिंकून आपले स्वाधीन करून घेतला होता, असें दिसून येतें. त्याच्या वेळेस राजपुतान्याचे लहान लहान असे पुष्कळ विभाग होते. त्या लहान लहान विभागांवर किंवा संस्थानांवर रजपूत किंवा मिना नामक संस्थानिकाचा अम्मल असून, ते सर्व, दिल्ली येथें जो त्या वेळेस सार्वभौम राजा होता, त्यास आपला स्वामी किंवा सार्वभौम असें मानीत असत.

धोलराय यानें लहान मोठीं अशीं पुष्कळ संस्थानें जिंकून, नंतर अजमीरच्या राजाच्या मुलीशीं त्यानें लग्न केलें आणि चिरस्थायी अशी आपल्या राज्याची व्यवस्था करून ठेविली. धोलराय लढाईंत मृत्यु पावला. तो मृत्यु पावला तेव्हां त्याची बायको गर्भवती होती. तिला जो मुलगा झाला त्याचें नांव कंकालता असें ठेविलें. हा पुढें गादीवर बसला. त्याचे मागून मैदुलराय नांवाचा मोठा शूर व विजयी होता तो गादीवर बसला. या उभयतांची कारकीर्द फारच थोडा वेळपर्यंत चालली. त्यांचे मागून हुनदेव कुंतल हा गादीवर बसला. त्यानें तद्देशीं अति प्राचीन काळापासून राहात आलेले जे मिना जातीचे लोक त्यांवर आपला खूप पगडा बसविला. तो मृत्यु पावल्यावर त्याचे मागून पुजन हा गादीवर बसला. हा त्या काळच्या राजांमध्यें मोठा विख्यात आणि शूर राजा होता. त्याचें लग्न दिल्लीचा राजा पृथुराज याच्या मुलीशीं झालें होतें, आणि

पुष्कळ लढायांत हा दिल्लीच्या राजाचा सेनापति होता. यानें दोन वेळ उत्तरे कडून ज्या अविध वगैरे लोकांच्या स्वाऱ्या होत असत त्यांस मोठ्या शौर्यानें मार्गे हटविलें आणि पुष्कळ वेळां सरहद्दीवर सैन्य नेऊन व लढाया करून, शाबुद्दीन यास खैबर घाटांतून हाकून देऊन त्याचा पाठलाग करीत तो गिझनीपर्यंत गेला.

यानें चंडाईल नांवाचा देश, जो दुसऱ्या एका राजानें जिंकिला होता तो, आपण जिंकून आपल्या राज्यांत सामील करून घेण्यासाठीं फारच अचाट असे पराक्रम केले. दिल्लीच्या राजास कनोनची राजकन्या देण्याच्या कामीं ज्या ६४ संस्थानिकांनीं मदत केली त्यांत हाही एक होता. हें कार्य करीत असतां पुजन याचा शेवट झाला. पुजन पासून पृथुराजा पर्यंत सांगण्यासारखें कांहींएक विशेष कृत्य झाले नाहीं. पुजन आणि पृथु राजा यांचे दरम्यान झालेल्या राजांचीं नांवें:-१ मालेसी, २ बिजल राजदेव, ३ कितन, ४ कौंतल, ५ जुनसी, ६ उदयकर्ण, ७ नर्सिंगबनवीर, ८ उद्धरण आणि ९ चंद्रसेन.

पृथु राजास १७ मुलें होतीं. त्यांपैकीं १२ चांगलीं वयांत आलेलीं होतीं. पृथु राजाविषयीं सांगण्या सारखें विशेष कांहीं एक झालें नाहीं. एके वेळीं हा सिंधुनदाच्या यात्रेस गेला होता त्यावेळीं त्याचा मुलगा भीम यानें राज्य लोभास्तव कपट करून त्यास ठार मारविलें. यानंतर बहर्म नांवाचा राजा गादीवर बसला. जयपूरच्या राजवंशांतील याच राजानें यवनराजांस नम्रतापूर्वक सन्मान वगैरे दिला. हा सन्मान पहिल्यानें बाबरास मिळाला.

पुढें याला हुमायुनानें एक मोठी पदवी दिली. त्याचा मुलगा भगवानदास यानेंही यवन राजांशीं विरोध करून त्यांना आपल्या देशांतून हाकून देण्याचा जो खऱ्या क्षत्रियकुलाचा धर्म तो टाकून, राज्यलोभास्तव* यवनराजांशीं सख्य केलें. त्याचा अकबर बादशाहाशीं मोठा स्नेह होता. या राजानें आपली मुलगी अकबराचा मुलगा सेलीम यास दिली होती.

क्षत्रिय कुलांतील हिंदुराजाच्या मुलीचा यवन राजाशीं विवाह संबंध करून क्षत्रिय कुळाला कलंक लावणारा असा हाच पहिला राजा होय. भगवानदास यास मूलबाळ कांहींएक नव्हतें. तो मृत्यु पावल्यावर त्याच्या मागून त्याचा पुतण्या मानसिंग हा गादीवर बसला. मानसिंग हा त्याच्या धाकट्या भावाचा मुलगा होय. अकबराच्या दरबारांत राजा मानसिंगासारखा तेजस्वी पुरुष दुसरा कोणी नव्हता. अकबर बादशाहानें राजा मानसिंग यास आपला सेनापति केला होता, आणि मानसिंगावर मोठमोठीं जोखमाचीं व पराक्रमाचीं कामें सोंपविलीं होतीं. मानशिंगानें लढाया मारून मोठमोठे प्रांत युक्तीनें जिंकून अकबराच्या राज्यास जोडिले. ओरिसा प्रांत राजा मानसिंगानें जिंकला व

---

* लोभ हा फार वाईट आहे. अकबरानें याला पैसा देऊन लोभ दाखविल्यामुळें यानें रजपूतांच्या मुली यवनांस देऊन रजपूत लोकांच्या जातीस व राजकुळास मोठाच कलंक लावला. आपण हिंदु व क्षत्रिय कुलोत्पन्न असून आपल्या पोटच्या मुली यवनांस देण्यास जे लोक मागें पुढें पाहात नाहींत त्यांना काय ह्मणावें!

आसाम प्रांतांतील राजे लोकांस जेरीस आणून त्यांस अकबर बादशाहाचे मांडलिक केलें.

राजा मानसिगानें जहांगिराचा वडील मुलगा खुसरू यास अकबराच्या मागें दिल्लीच्या बादशाही तक्तावर बसविण्याविषयीं होता तितका प्रयत्न केला; परंतु त्यांत त्यास यावें तसें मुळींच यश आलें नाहीं. मानसिग मोठा बलाढ्य असल्या कारणानें कोणासही याला मोकळेपणानें शिक्षा करितां आली नाहीं. मानसिग इ० स. १६१५ त मृत्यु पावला. त्याच्या मागून राजा रायसिंग हा गादीवर बसला. त्याचे मागून जोदाबाई (एक रजपूत राजघराण्यांतील बायको) च्या सांगण्यावरून जहांगीर यानें अकबराचें सर्व राज्य मानसिंगाचा पुतण्या जयसिंग यास दिलें. ही योजना फारच चांगली झाली. जयसिंग हा मोठा होतकरू पुरुष होता.

जयसिंग यास मिर्झा राजा असें लोकांत ह्मणत. यानें आपल्या शहाणपणानें आपल्या घराण्याचा गेलेला लौकिक पुन: संपादन केला. अवरंगजेबाच्या कारकीर्दींत यानें पुष्कळ पराक्रमाचीं कामें केलीं, ह्मणून यास अवरंगजेबानें मोठ्या अधिकाराचें काम दिलें होतें. त्यानें शिवाजी महाराजांस दिल्लीच्या बादशाहास भेटण्यास नेलें. पुढें शिवाजी तेथून पळून गेला, ह्मणून बादशाहास शिवाजीच्या संबंधानें जयसिंगाचा संशय आला. हें एक बादशाहाची जयशिंगावरील मर्जी उतरण्यास कारण झालें. जयसिंग आपल्या दरबारांत आपल्या उमरावांसहवर्तमान बसला असला ह्मणजे नेहमीं दोन बाजूंस दोन आरसे घेऊन

नसे. त्या आरशांपैकीं एकाचें नांव सातारा शिवाजी व दुसऱ्याचें नांव दिल्ली अवरंगजेब अशीं होतीं. त्यांपैकीं शिवाजीचा आरसा जयशिगानें एके दिवशीं जमिनीवर फेंकून ह्मणाला, हा पहा सातारा कसा चालला आहे, आतां दिल्लीची व्यवस्था माझ्या उजव्या हातांत आहे. ही दिल्लीच्या बादशाहाविषयींची जयशिंगाची तुच्छबुद्धि उडत उडत अवरंगजेबाच्या कानावर गेली. तेव्हां तर तो फारच रागावला; आणि, आतां या जयसिंगाच्या नरडीचा घोट केव्हां घेईन असें त्याला झालें. त्यानें लागलींच जयसिंगास मारण्याच्या पुष्कळ योजना केल्या. पुढें कांहीं दिवसांनीं जयसिंगाचा धाकटा मुलगा किरातसिंग ह्मणून होता त्यास अवरंगजेबानें असा निरोप पाठविला कीं, जर तूं अपल्या बापास ठार मारशील तर मी तुझ्या वडील भावास गादीवर बसूं न देतां तुला गादीवर बसवीन. त्यावरून त्या दुष्ट मुलानें आपल्या बापास मारण्याबद्दलचें अवरंगजेबास वचन दिलें. जयसिंग यास अफू खाण्याचें व्यसन फार होतें, हें ह्या पितृहत्या करण्यास तयार झालेल्या मुलास माहीत असल्या कारणानें त्यानें त्याच्या अफूच्या गोळींत एक दिवस विष घालून आपल्या बापास खाण्यास* दिली. तिच्या योगानें जयशिंग लवकरच मृत्यु पावला.

* धिक्कार असो त्या राज्यतृष्णेला. हिच्यासाठीं प्रत्यक्ष पित्याची यत्किंचितही दया न येतां त्याला मारण्याविषयीं बेधडक पोटचाच पुत्र प्रवृत्त झाला. असो,राज्यतृष्णेचा महिमाच अगाध आहे!

मनुष्यास पापाचें फळ बहुतेक अंशीं ह्या जगांतच प्राप्त होतें. या नियमाप्रमाणें या पितृहत्या करणाऱ्या मुलास शेवटीं अवरंगजेबानें कबूल केल्याप्रमाणें सर्व राज्य न देतां त्यांतला एक लहानसा मुलूख मात्र दिला. त्यामुळें किरातसिंगास राज्यलोभाचा भ्रम होऊन राज्य राज्य ह्मणूनच तो मृत्यु पावला. त्याप्रमाणेंच अवरंगजेबानें मुलाकडून त्याच्या बापाचा घात करविला हें एक आणि कबूलीप्रमाणें त्यास सर्व राज्य न देतां त्यांतला कांहीं मुलूख मात्र दिला, हें दुसरें, या दोन कृत्यांमुळें त्याच्याही पापाचा घडा लवकरच भरला व तेव्हांपासून अवरंगजेबाच्या राज्यास उतरती कळा लागली. जयसिंगानंतर रामसिंग व त्यानंतर किसनसिंग हे क्रमानें राजे झाले. त्यांच्या हातून विशेष कांहींएक झालें नाहीं. त्या नंतर सवाई जयसिंग नामें राजा गादीवर बसला. याची कारकीर्द मात्र विशेष लक्षांत ठेवण्याजोगी आहे.

अवरंगजेब मुत्यु पावण्याचे पूर्वी ८ वर्षें ह्मणजे इ० सन १६९९ त हा सवाई जयसिंग गादीवर बसला. गादीवर बसतांच त्यानें दक्षिणेंत बादशाहाची मोठी उत्तम कामगिरी बजाविली. अवरंगजेब मृत्यु पावल्यानंतर सवाई जयसिंगास एक साथीदार मिळून त्यानें लगेच आपल्या बादशाहाची द्वाही फिरविली. या संबंधानें त्यास पुष्कळ लढाया कराव्या लागल्या. त्यांत धवलपूरची लढाई फार प्रसिद्ध आहे. या लढाईंत याचा फार नाश झाला.

दिल्लीचे तक्तावर बहादरशहास गादीवर बसविण्याचें सवाई जयसिंगाच्या मनांत नव्हतें, यामुळें बहादरशहानें त्याचा मुलू-

व खालसा करण्याविषयीं हुकूम केला. या हुकुमाअन्वयें जयपूर ताब्यांत घेण्यासाठीं बादशाहाचा सुभेदार येतांच सवाई जयसिंगानें स्वतः हातांत तरवार धरून मोठ्या धैर्यानें लढाई मारिली, आणि बादशाहाचे स्वारांस हाकून लावून इतःपर मुसलमान त्रास देऊं लागले असतां उदेपूरचा राणा व जोधपूरचा राणा या उभयतांनीं एकमेकांस मदत करून मुसलमानांचा नाश करावा असें ठरविलें. राजा सवाई जयसिंगाप्रमाणें विद्वद्गुणाभिलाषी व विद्वान् असा राजा हिंदु राजांत आलिकडील २००० वर्षांत कोणी झाला नाहीं, असें ह्मटलें तरी चालण्यासारखें आहे. त्याला गणित, शिल्प, आणि सृष्टपदार्थविज्ञानशास्त्र फार आवडे. ज्योतिषशास्त्रांत तर त्यावेळच्या युरोपांतील मोठमोठ्या विद्वानांच्या बरोबरीनें याची विद्वत्ता होती. यानें त्यावेळीं जी एक पंचांगाची सरणी करून ठेविली आहे, तिजवरूनच आलीकडे मारवाडांत जीं पंचांगें चालतात तीं वर्तवीत असतात. यानें युक्लीड, त्रिकोणमिती व आणखी दुसरे चांगले ग्रंथ केले आहेत. संस्कृतांतही हा चांगला निपुण होता व त्या भाषेंतही यानें केलेले कांहीं ग्रंथ आहेत.

कर्ण याच्यासाठीं सवाई जयसिंगानें एक नवीन शहर बसविलें, त्याचें नांव जयपूर. शिल्पशास्त्राप्रमाणें बरोबर प्रमाणांत बसविलेलें असें हिंदुस्थानांत एवढेंच काय तें शहर आहे. त्यानें स्वतः आपल्या कल्पनेनें ग्रहांचे वेध घेण्यासाठीं यंत्रें तयार करून त्या यंत्रांसहित दिल्ली, जयपूर, बनारस, आणि मथुरा येथें प्रचंड वेधशाळा बांधिल्या. या वेधशाळेंतून घेतलेले वेध इतक्या बरोबर

रीतीनें प्रत्ययास येतात कीं ते पाहून मोठमोठे विद्वान् आश्चर्यानें अगदीं थक्क होऊन जातात.

सवाई जयसिगानें केवळ वेधशाळा, राजधानी व शास्त्रीय यंत्रें एवढींच कामें केलीं असें नाहीं; तर त्यानें पाथरवट लोकांच्या उपयोगासाठीं मोठमोठ्या सरसाया बांधिल्या आहेत. हीं कृत्यें त्यानें राज्यकारस्थानांत आणि लढायांत गुंतलेला असतांनाच करून टाकिलीं. सवाई जयसिंगास जरी दिल्लीच्या मुसलमान पातशाहीच्या पारतंत्र्यांतून अगदींच सुटवलें नाहीं तरी त्यानें आपल्या पराक्रमानें व शौर्यानें आपल्या देशास सुधारून आजुबाजूच्या संस्थानांपेक्षां आपले राज्याची मोठी बळकट आणि चिरस्थायी स्थापना केली. त्यानें राजपुतान्यांतील पुष्कळ संस्थानिकांचें करवेलें तितकें रक्षण केलें, परंतु एके वेळीं त्यांना कांहीं कामासाठीं उत्साह आणण्याविषयीं पुष्कळ यत्न केला तो व्यर्थ गेल्यापासून त्या राजकारणाकडे त्यानें अगदीं दुर्लक्ष करून आपले अत्यंत प्रिय विषय जे ज्योतिष, इतिहास, गणित, वगैरे त्यांकडेसच सर्व लक्ष लाविलें.

इ० सन १७२० सालच्या डिसेंबर महिन्यांत महंमदशाहा दिल्लीच्या गादीवर बसल्यावर सवाई जयसिंग यानें आपलें मन अभ्यासांतून काढून राज्याची सुधरणा करविण्याकरितां त्यास आग्रा आणि माळवा येथील मुख्य अधिकाऱ्याची जागा दिली. या अधिकारावर असतां त्याची कीर्ति फारच पसरली. यानें अधिकार हातीं घेतल्या बरोबर प्रथम पुष्कळ प्रकारचे कर माफ केले. हे कर अवरंगजेबानें बसविलेले होते. त्याच प्रमाणें त्यानें जाट

लोकांस त्या प्रांतांतून हांकून लावून दिलें. नंतर इ०स० १७३२ त याची माळव्यांतील सेनापतीचे कामावर पुन: नेमणूक केली. तेव्हां आतां मराठे लोकांच्या स्वाऱ्या सवाई जयसिंगास क्षुल्लकशा वाटून त्यानें त्यांविषयीं फारशी काळजी बाळगिली नाहीं. नंतर त्यांनीं महमदशाहाचें मत घेऊन बाळाजी विश्वनाथ याशीं स्नेह संपादन केला, आणि माळव्याचा वसूल पूर्ववत पेशव्याकडे असावा असें राजाच्या मनांत भरवून दिलें. नादीरशाहानें स्वारी केली तेव्हां हा कोणत्याच पक्षास अनुकूल न होतां उदासीन स्वस्थ एकीकडे राहिला होता. कारण ह्या लढाईंत जय कोणाचा होईल याविषयीं त्यांस पूर्ण खातरी नव्हती.

सवाई जयसिंग हा इ०स० १७४३त मृत्यु पावला.त्यानें ४४ वर्षे मोठ्या दक्षतेनें राज्य केलें. या वेळेस सर्व हिंदुस्थानांतील मोठमोठीं संस्थानें एकामागून एक अस्तास चाललीं होतीं. तरी याच्या कारकीर्दींत जयपुरास मोठें सौख्य होतें.त्यानें देवती व राजर हे दोन परगणे आपल्या राज्यास जोडून त्यांची उत्तम प्रकारची व्यवस्था केली. हा मोठा गर्विष्ट असून मद्यपी होता असें लोक ह्मणतात. तरी हिंदुस्थानांतील राजे लोकांत हा अद्वितीय पुरुष होऊन गेला, ही गोष्ट अगदीं निर्विवाद आहे. तो मृत्यु पावला तेव्हां त्याजबद्दल लोकांस फारच वाईट वाटलें. याचे मागून त्याचा वडील भाऊ इसरीसिंग हा गादीवर बसला. उदेपूरच्या ठरावाप्रमाणें मेवाडच्या राजकन्येचा मुलगा माधवसिंग हा जरी धाकटा होता तरी गादीचा खरा वारिसदार तोच होता. ह्मणून माधवसिंगानें आपली गादी आपणास मिळण्याविषयीं

बराच यत्न केला, परंतु तो सफळ झाला नाहीं. ह्मणून शेवटीं होळकरास रामपूर, भरतपूर, आणि टोंक हे प्रांत व शिवाय ८४,००,००० रुपये मदतीबद्दल देण्याचें कबूल करून त्यास आपल्या साह्यास घेतलें व उभय पक्षांच्या लढाया होऊन शेवटीं माधवसिंगास जयपूरची गादी मिळाली व त्यानें राज्यही फार उत्तम रितीनें केलें.

पुढें जाट लोकांची सत्ता फार वाढली, आणि त्यांच्याशीं संग्राम सुरू झाला. त्या लढायांत जाट लोकांचा सर्वांशीं पराभव जरी झाला आणि त्यांची बरीच खोड जिरली तरी जयपूरचें संस्थानचें मात्र या लढायांच्या योगानें फार नुकसान झालें. त्यांचे मोठमोठे शूर सरदार या रणांत पडले व पुढें लगेच ४ दिवसांनीं माधवसिंगही मृत्यु पावला. जर माधवसिंग कांहीं वर्षें जगला असता तर त्यानें जयपूर शत्रूच्या ह्मणजे जाट लोकांच्या हातीं खास जाऊं दिलें नसतें. हा राजाही आपल्या बापाप्रमाणेंच मोठा विद्वान् असून गुणीजनांचा आदरसत्कार करणारा असा होता. त्यानेंही मोठमोठीं अनेक शहरें वसविलीं, त्यांत आपल्या नांवाचें माधवपूर ह्मणून एक उत्तम शहर वसविलें. हें शहर रणथंबोरच्या किल्ल्याजवळ असून व्यापारास फारच सोईचें आहे. या शहरासारखें शहर राजपुतान्यांत दुसरें नाहीं अशी प्रसिद्धि आहे.

पृथुसिंग गादीवर बसला, त्यावेळीं तो लहान होता. याची आई मोठी महत्वाकांक्षी, दुष्ट व दुराचारी होती. ही एका हलकट महाताशीं लागू होती व सर्वकाळ त्याच्या नादानें वागे; यामुळें राज्यांत फारच अव्यवस्था, दंगेधोपे

व चहूंकडे बेबंदशाही होऊन गेली होती. त्यामुळें सुमारें ९ वर्षे पर्यंत जयपूर संस्थानांत सर्व कामकाजाचा फारच घोटाळा होऊन गेला. पुढें पृथुसिंग घोड्यावरून खालीं पडून मृत्यु पावला. पुष्कळ लोकांच्या मनांत यास त्याच्या दुष्ट आईनें विष घालून ठार मारिलें असा संशय आहे. ह्या राजास दोन बायका होत्या. त्यांपैकीं एकीस 'मानसिंग' नांवाचा मुलगा होता. त्यास त्याच्या नातेवाईकांनीं लगेच शिंद्याच्या स्वाधीन करून ग्वाल्हेर येथें त्याच्या मातुळांच्या घरीं रक्षणासाठीं पाठविलें.

पृथुसिंगाच्या मागून त्याचा सावत्र भाऊ प्रतापसिंग ( ठेविलेल्या बायकोपासून झालेला ) हा गादीवर बसला. त्यानें २६ वर्षे राज्य केलें. हा राजा फार कपटी होता, त्यामुळें याचें राज्य एकसारखें तंट्यांतच पडलें होतें. हे तंटे चालले असतांनाच प्रतापसिंगानें पृथुसिंगास विषप्रयोग झाला कीं काय याविषयींची यथास्थित माहिती मिळवून विषप्रयोग करणारांस देहांत अशी शिक्षा हाल करून देणार होता; परंतु इतक्यांत जयपुरावर मराठ्यांच्या एकामागून एक स्वाऱ्या होऊं लागल्यामुळें तें प्रकरण तसेंच दबून राहिलें. नंतर राजा प्रतापसिंग यानें मोठाल्या टोळ्या जमवून मराठ्यांचा चांगल्या रीतीनें समाचार घ्यावा व त्यांची खोड जिरवावी असा निश्चय केला. या हेतूनें त्यानें राजा विजयसिंग आणि जोधपूरचे राजे यांच्याशीं मित्रत्वाचा करार करून त्यांचें साह्य घेतलें व सर्वांनीं मिळून टोंक येथें मराठ्यांचा पराभव केला. परंतु हा जय फार वेळ टिकला नाहीं.

पाटण आणि मैत्र येथें पराभव झाल्या कारणानें आणि त्याचप्रमाणें जोधपूरच्या राजाशीं बेबनाव झाल्यामुळें शत्रूला दुप्पट उत्तेजन येऊन तो लढाईस सिद्ध झाला; आणि लढाया मारतां मारतां शेवटीं प्रतापसिंगाचा पराभव करून, जयपूरावर होळकरानें लढाईच्या खर्चाबद्दल वार्षिक खंडणी बसविली व तिचा हवाला अमीरखानाचे शिरावर टाकला. या वर्षापासून तों इ० सन १८०३ पर्यंत नेहमीं एकामागून एक मराठ्यांच्या (शिंद्याचें सैन्य) चोरांच्या टोळ्यांनीं जयपूर शहर अगदीं उध्वस्त करून टाकिलें.

प्रतापसिंग हा मोठा पराक्रमी असून याला तारतम्यज्ञानही बरेंच होतें. परंतु त्याच्या पराक्रमाचा आणि शहाणपणाचा जयपूरच्या लोकांस कांहींच उपयोग करून घेतां आला नाहीं. त्याचे मागून त्याचा मुलगा राजा जयसिंग हा गादीवर बसला. यानें १६ वर्षे राज्य केलें. या राजासारखा विषयासक्त पुरुष त्याच्या वंशांत कोणीही झाला नाहीं. हे राजे साहेब अतिशय व्यभिचारी व कंजुस असून त्यांस अब्रूची चाड ह्मणून काडीइतकीही नव्हती. हे राजेसाहेब इतके अविचारी व दुर्गुणी होते कीं, राज्यांत चांगल्या बायका दृष्टीस पडल्या कीं, त्या मिळविण्या करितां लाखो रुपये खर्चून जुलमानें त्यांचें पातिव्रत्य नष्ट करीत. राज्यकारभारा पेक्षां या अघोर कामगिरिवरच त्यांनीं हजारो नोकर लोक ठेविले होते. यामुळें प्रजाजन आपल्या बायका घराबाहेर मुळींच जाऊं देत नसत.* या राजे साहेबांनीं ए-

* याच मासल्याचीं उदाहरणें मागें बडोद्यास होत होतीं व यामुळेंच श्रीमंत मल्हारराव गायकवाडांस मद्रास पहावी

कवेळ गांवांतील चांगल्या बायका वाड्यांत आणून 'घटकंचुकी' केली. त्यावरून प्रजेनें त्यांच्या विषयीं फारच तिरस्कार दर्शविला. व तेव्हांपासून ती याच्या विरुद्ध वागूं लागली.

उदेपूरच्या राण्याची इतिहासप्रसिद्ध मुलगी कृष्णाकुमारी हिच्या सौंदर्याचा लौकिक ऐकून जयसिंग इतका वेडावला होता कीं, त्यानें ती मुलगी आपणासच देण्याविषयीं तिच्या बापास आग्रह केला. परंतु तिच्या बापाच्या मनांतून आपली मुलगी अशा मूर्ख राजास देण्याचें नव्हतें. त्यामुळें तंटा सुरू होऊन क्रूर, निर्दय आणि निमकहराम असा जो अमीरखान नांवाचा सरदार त्याचे हातून जयसिंग राजाचा शेवट झाला. त्यावेळेपासूनच राजपुतान्याच्या नष्टचर्येस प्रारंभ झाला. अशा राजाचें वर्णन करण्यास मन सुद्धां लज्जित होतें ह्मणून याच्या अघोर कृत्यांचें वर्णन आह्मीं करीत नाहीं. हा मारला गेला तेव्हां याच्यासाठीं कोणीही रडलें किंवा हळहळलें नाहीं. हा जिवंत असतांना एका कारणावरून जयपूरचा ब्रिटिश सरकाराशीं संबंध सुरू झाला. इ० स० १८०३ च्या तहाअन्वयें जयपूरचें

---

लागली. दक्षिण महाराष्ट्रांत सांगली ह्मणून एक लहानसें संस्थान आहे तेथें अण्णा साहेब पटवर्धन कारभारी असल्यावेळा त्यांची वर्तणुक या राजसाहेबांपेक्षांही फार वाईट तऱ्हेची होती. गांवांत सुंदर बायको दिसण्याबरोबर तिला आणण्याकरितां मेणा जात असे. ती निरोपाबरोबर आल्यास बरें; न आल्यास तिच्या नवऱ्यास एकदम हद्दपार करीत किंवा नौकर असल्यास एकदम बडतर्फ करीत असत असें ऐकण्यांत आहे यांनी ही एकवेळ घटकंचुकी केली होती व या अन्यायामुळेंच यांना सांगलींतून काढून दूर नेऊन ठेविलें व त्यांस सांगलीचे आसपास ३० कोसपर्यंत येण्याची ब्रिटिश सरकारानें सक्त मनाई केली होती.

सरकार आणि इंग्रज यांनीं अडचणीचेवेळीं एकमेकांस सहाय करावें असा ठराव झाला. पुढें जयपूरच्या राजाचा संबंध इंग्रज सरकारापासून अगदीं तोडून टाकावा किंवा अशा मताला मान द्यावा हें योग्य कीं काय याविषयीं विलायतेंत खूप वाटाघाट चालून शेवटीं इ० स० १८३३ त विलायतेहून असा हुकूम आला कीं ज्यावेळेस प्रसंग येईल त्यावेळेस जयपूरच्या राजास इंग्रज सरकारानें सर्व प्रकारें साह्य करावें. परंतु यावेळेस नेपाळाशीं लढाई सुरू असल्या कारणानें हें प्रकरण जितकें लांबववेल तितकें लांबणीवर टाकावें असें इंग्रज सरकारच्या त्यावेळच्या अधिकाऱ्यांस वाटलें. इ० स० १८१७ त जेव्हां पुन: तहाची बोलणीं सुरू झालीं तेव्हां जयपूरच्या महाराजानें सांगितलें कीं माझी या तहास कबूली नाहीं. पुढें कांहीं दिवस लोटल्यावर जयपूर संस्थानांस पुष्कळ अवश्य कामें पडलीं ह्मणून त्याप्रमाणेंच आसपासच्या संस्थानिकांचें भिडे-भिडेनें तरी अनुकरण करणें योग्य वाटून व इंग्रज सरकार आपणांस साह्य करणार नाहीं या भीतीनें व अमीरखान याच्या घोडेस्वाराच्या लुटालुटी आणि त्याचीं जयपूरच्या संस्थानिकांशीं चाललेलीं कारस्थानें वगैरे सर्व गोष्टींवरून शेवटीं जयपूरचे महाराजांस इंग्रजांबरोबर तह कबूल करावा लागला.

इ० स० १८१८ च्या तारीख २ एप्रिल रोजीं इंग्रज सरकारानें जयपूरचें संरक्षण करावें व त्याचप्रमाणें इंग्रज सरकारासही जेव्हां मदत लागेल तेव्हां ती जयपूरच्या राजानें बिनदिक्कत द्यावी; शिवाय रेविन्यू खात्याचें उत्पन्न ४० लाख रुपयांच्या आंत आहे तोंपर्यंत प्रतिवर्षी

८ लाख रुपये आणि ४० लाखांवर उत्पन्न होऊं लागलें ह्मणजे त्यापैकीं $\frac{६}{१६}$ रुपये आठ लाख रुपयांत जास्ती घालून ती रकम दरवर्षीं इंग्रज सरकाराकडे खंडणीदाखल भरली पाहिजे असा एक वेगळा तह झाला.

महाराजांच्या ज्या जमिनी लोकांनीं उपटल्या होत्या त्या त्यांचेकडून ईंग्रजांनीं परत घेऊन महाराजांस दिल्या. त्याचप्रमाणें जयपूरच्या राजानेंही आपल्या पदरच्या सरदारांस "मी कोणत्याही रीतीनें तुमच्याशीं अन्यायानें न वागतां तुमचे हक्क उत्तम रीतीनें पालन करीन" ह्मणून सांगितलें.

राजा जयसिंग याला मूलबाळ कांहींएक नव्हतें. तो इ० सन १८१९ त मृत्यु पावला. तेव्हां गादीस योग्य वारस कोणी नसल्यानें राज्यांत पुष्कळ प्रकारच्या भानगडी उत्पन्न झाल्या व हें प्रकरण लढाईवर येतें कीं काय अशी सर्वत्रांस भीति पडली. परंतु प्रजेच्या सुदैवेंकरून तसा योग आला नाहीं. वारसासंबंधीं मात्र लोकांचे वेगवेगळाले विचार चालले होते. कांहीं लोकांचा विचार असा होता कीं, नरवरच्या पदच्युत राजाचा मुलगा मोहनसिंग यास गादीवर बसवावें. हा मुलगा जयपूरचा राजा जो पृथुराज त्यापासून १४ वा पुरुष होता. परंतु तो फारच दूरचा संबंधी असल्या कारणानें कित्येकांस हा विचार आवडेना. तेव्हां गादीवर कोणास बसवावें याविषयीं बऱ्याच वाटाघाटी होतां होतां शेवटीं मयत जयसिंगाच्या राण्यांपैकीं एक राणी गर्भवती आहे असें मंत्रीमंडळास कळतांच त्यांनीं जयसिंगाच्या १५ राण्या व त्याचप्रमाणें

राज्यांतील मोठमोठे मानकरी, अमीर, उमराव आणि सरदार ह्यांच्या बायका जमवून त्यांच्याकडून त्या राण्यांपैकीं कोणी गर्भिणी आहे कीं काय याची परीक्षा करण्याकरितां त्या बायकांस जनानखान्यांत पाठविल्या. त्या तेथें गेल्यावर त्यांनीं हल्लींच्या बुकांच्या ज्ञानानें सुईणपणा करणारणींसारखी लज्जास्पद परीक्षा न करितां जनानखान्यांतील सर्व स्त्रियांच्या तोंडावरूनच परीक्षा* करून "भट्टिनीं गर्भिणी आहे असें जेव्हां खास सांगितलें तेव्हां सर्व प्रजा फारच आनंदित झाली व त्याप्रमाणें पुढें लवकरच अनुभवही आला.

नंतर सर्व प्रजेनें एकदिल होऊन असें ठरविलें कीं जर भट्टीणीला मुलगा झाला तर तो आमचा सर्वांचा स्वामी होय. त्या मुलाशिवाय आह्मीं दुसऱ्या कोणालाही स्वामी मानणार नाहीं.

इ० सन १८१९ च्या एप्रिल महिन्याच्या २१ व्या तारखेस जगत्‌सिंग मृत्यु पावला त्यावेळेपासून ४ महिने व ४ दिवस लोटल्यावर सर्व लोकांस अत्यानंद देणाऱ्या अशा पुत्रास भट्टिनी प्रसवली; तेव्हां जयपूरच्या राज्यांत

---

* हल्लीं परीक्षा घेऊन व शरावर मोठमोठ्या पाट्या लावून लोकांस मोहनी घालणारे डाक्टर व सुईणी गल्लोगल्लीं पुष्कळ आहेत. रोग्यानें स्वतः जेव्हां सर्व रोग किंवा लक्षणें सांगावीं, तेव्हां ते औषध देणार. तोंडावरून किंवा नाडी वरून परीक्षा होण्याची यांस कोण मारामार पडते याचा अनुभव पदोपदीं सर्वांस येत आहेच. त्याचप्रमाणें सुईणी. एखादी बायको खरोखरी गरोदर असली तरी यांना त्याबद्दल परीक्षा होत नाहीं व रोग एक आणि औषध भलतेंच. तसा प्रकार पूर्वी नव्हता.

जिकडे तिकडे फारच आनंदीआनंद झाला; आणि त्या राज्यांतील सगळ्या लोकांनीं या मुलास आपला स्वामी असें कबूल केलें.

या मुलाचें नांव जयसिंग असें ठेविलें. याच्या नांवानें त्याची आई राज्यकारभार चालवूं लागली. हा मुलगा वयानें लहान असतां जयपूरच्या राज्यव्यवस्थेंत इतकी बेंडाळी आणि अनीति माजली कीं, शेवटीं इंग्रज सरकारास जयपुरांत एक इंग्रज कामदार नेमणें भाग पडलें. शिवाय इंग्रज सरकारचें नुकसान होऊं नये व वेळच्यावेळेस खंडणी मिळावी, ह्मणून त्या इंग्रज कामगारास जयपूरच्या अंतस्थ राज्यव्यवस्थेंतही पाहिजे तितका हात घालण्याची परवानगी देणें भाग पडलें. त्याप्रमाणें त्यानें चांगली सुधारणाही केली.

इ०सन १८३४ आणि ३५ सालीं ब्रिटिश सरकारास शेखवती एथें त्या प्रांताच्या स्वामित्वाचा निकाल करण्यासाठीं सैन्य नेणें आवश्यक वाटल्यावरून त्यांनीं तसें केलें, व सांबर एथील मिठाच्या सरोवरामध्यें जो जयपूरचा वांटा होता, त्याचें स्वामित्व, आपल्याकडे लढाईचा खर्च परत येईतोंपर्यंत, त्या खर्चाच्या जामिनगिरीदाखल घेतलें.

इकडे शेखवतीविषयींचा निकाल लागण्याच्या बेतांत आला आहे तों इतक्यांत राजा जयसिंग मृत्यु पावला. त्याच्या मरणाचें कारण कपटी जोथाराम आणि रूपरदन या नांवाची त्याची दासी हीं दोघें होतीं.

जोथाराम याचा पूर्वींच्या राणीशीं कांहीं अनीतिचा संबंध होता. यामुळें तिच्या कारकीर्दींत यानें राज्यांत फारच अव्यवस्था करून टाकिली होती. आणि प्रजाही फारच त्रासून

गेली. हें ब्रिटिश सरकारास समजतांच गव्हर्नर जनरलचा एजंट या नांवाचा एक कामगार जयपुरास पाठवून दिला. त्यानें चौकशी करून तेथील बंडाळी मोडून राजाच्या धाकट्या मुलाच्या रक्षणाची व्यवस्था करण्यासाठीं जयपुरास आल्यावर गव्हर्नर जनरल यांनीं सांगितलेल्या कामाची कसून चौकशी करण्यासाठीं कडक उपायांची योजना करणें त्या कामगारास भाग पडलें. त्यामुळें जोथाराम यानें बंड केलें व गव्हर्नर जनरलचे एजंट कर्नल आलव्ह यांना ठार मारण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केले. परंतु ते सर्व व्यर्थ गेले ह्मणून त्यांचे बदली मिस्तर ब्लेक नांवाच्या एका युरोपियन कामदारास ठार मारून टाकिलें. याबद्दलची पुष्कळ तऱ्हेनें चौकशी सुरू होती, परंतु तपासच लागेना. पुढें कांहीं लोकांच्या सांगीवरून जोथा-राम यांस पकडतांच खुनाचा पत्ता लागला व त्याचे साथीदारही मिळाले. नंतर त्याची रीतीप्रमाणें चौकशी होऊन त्या सर्वांस जन्मठेपेच्या शिक्षा देऊन त्यांना 'चुनार'च्या किल्यांत नेऊन ठेविलें. तेथें त्यांचे फार हाल होऊन त्या हालांतच हे लोक मृत्यु पावले. या लोकांचीं प्रेतें तुरुंगांत पुष्कळ दिवसपर्यंत पडून राहिल्यामुळें सडून गेलीं होतीं तरी कांहीं दिवसपर्यंत तिकडे कोणी ढुंकूनही पाहिलें नाहीं.

तरुण राजे रामसिंग यांचें रक्षण ब्रिटिश सरकारच्या पोलिटिकल एजंटाचे हाताखालीं एक रिजन्सीचें कौन्सिल नेमून त्यांत मोठमोठे जयपूरचेच ५ सरदार सभासद नेमिले व त्यांच्या अनुमतानें सर्व राज्यव्यवस्था चालावी

असें ठरविलें. व खर्चाच्या कामींही पुष्कळ काटकसर केली व अनवश्यक फौज कमी करून राज्यांत पुष्कळ तऱ्हेच्या सुधारणा केल्या. सती, दास्यत्व, बालहत्या वगैरे प्रकार बंद केले. राज्याचे वसूलापेक्षां इंग्रज सरकारची खंडणी फार होती, असें या कामगारास दिसून आल्यामुळें त्यानें इ० स० १८४२ त ४२ लक्षांची सूट देवविली; आणि पुढें प्रतिवर्षीं खंडणीमध्यें ४ लक्ष रुपये कमी केले. त्या योगानें रयत फारच सुखी झाली. महाराज रामसिंग यांनीं इ० सन १८५७ सालच्या बंडाच्या प्रसंगीं इंग्रज सरकारास पुष्कळ प्रकारची मदत केल्यावरून त्यांस एक चांगला सुपिक प्रांत इंग्रज सरकारानें खुष होऊन बक्षीस दिला आहे. या प्रांतावर देखरेख इंग्रज सरकारचीच आहे.

महाराज रामसिंग हे मोठे बुद्धिमान् असून आपल्या राज्याची सुधारणा करून वसूल वाढविण्याचा त्यांचा हेतु आहे. या हेतूनें त्यांनीं पुष्कळ कामांस आरंभ केला आहे. त्यांनीं आपल्या प्रांतांत रेलवेही तयार केली आहे. आणि विद्येस दिवसेंदिवस जास्ती उत्तेजन देत आहेत.

इ० स. १८६८ त धान्य फार महाग झालें होतें; तेव्हां त्यांनीं बाहेरच्या प्रांतांतून स्वराज्यांत धान्य आलें असतां त्यावर जी जकात घेण्यांत येत असे ती काढून टाकिली. त्यांच्या एकंदर राज्यव्यवस्थेवरून त्यांस देशकालमानानुसार राज्यांत कोणत्या सुधारणेच्या गोष्टी केल्या पाहिजेत याचें चांगलें ज्ञान आहेसें दिसतें. या महाराजांचा नेटिव लोकांपेक्षां इंग्लिश लोक आणि त्यांच्या मडमा यांकडे फार ओढ आहे, याविषयींचीं दोन ताजीं

उदाहरणें मासल्याकरितां सांगतों. पहिलें उदाहरण- या महाराजाचा इ० सन १८८८ त जो वाढदिवस झाला त्याप्रीत्यर्थ त्यांनीं जसा पैशाचा पाऊस पडतो त्याप्रमाणें नाच, गाणें, तमाशे, दारूकाम रेसिडेन्सींतील युरोपियन लोकांस व त्यांच्या स्त्रियांस वगैरे इत्यादि निरुपयोगी व केवळ स्वतांच्या हौसेकरितां लक्षावधि रुपये खर्च केले.* दुसरें उदाहरण-हे महाराज इ० सन १८८७ त विलायतेस "ज्युबिली" करितां गेले होते त्या वेळीं तेथें त्यांनीं युरोपियन स्त्रीपुरुषांकरितां अतोनात पैसा खर्च केला हें होय. हाच पैसा जर ते आपल्या संस्थानांत खर्च करते तर त्यांच्या प्रजेस त्यापासून पुष्कळ प्रकारचें सौख्य होऊन शिवाय तो सर्व पैसा देशांतल्या देशांत तरी राहिला असता, व तेणेंकरून त्यांच्या प्रजेचेंच नव्हे तर परंपरेनें सर्व हिंदुस्थानच्या लोकांचें कल्याण झालें असतें. परंतु हे विचार हिंदुस्थानचें नष्टचर्य संपल्यावांचून आमच्या राजेलोकांच्या मनांत यावयाचे नाहींत असें म्हणूनच स्वस्थ राहिलें पाहिजे. "गव्हर्नर जनरलचे" हे

* याच मासल्याचें उदाहरण दक्षिणमहाराष्ट्रदेशांत एक लहानसें संस्थान आहे तेथें दृष्टीस पडतें. तेथील संस्थानिकांचीही स्वजातीयांपेक्षां इतर जातीच्या लोकांवर फार प्रीति आहे. फरक इतकाच कीं 'जयपुरच्या महाराजांची' ओढ युरोपियन स्त्रिपुरुषांकडे फार आणि या संस्थानिकांची मुसलमानांकडे फार आहे. यांस बारमहा नवे नौकर बरचेवर पाहिजेत. ह्या संस्थानिकांची मर्जी आणि गैरमर्जी ही दुपारच्या सांवलीसारखी असते. हें सुद्धां निरुपयोगी कामाकडे पुष्कळ खर्च करतात.

राजे साहेब तीन वेळां " कौन्सिलर* " होते. परंतु यांनीं आपला स्वतंत्र अभिप्राय ह्मणून कधींच दिला नाहीं. जिकडे बहुमत तिकडे यांचें अनुमोदन पडत असे.

जयपूर शहरची रचना फार मनोहर आहे. हें शहर बांधतेवेळींच प्रथमतः रस्त्याच्या वगैरे सर्व सोयी करून शिल्पशास्त्राप्रमाणें शहरांतील सर्व घरें एकसारखीं प्रमाणबद्ध बांधलेलीं आहेत. या शहरासारखें रम्य शहर हिंदुस्थानांत दुसरें नाहीं. मोठ्या रस्त्याशिवाय एथें लहान रस्ते किंवा बोळ मुळींच नाहींत. रस्ते आणि घरें हीं सर्व एकसारखीं नमुन्याप्रमाणें आहेत. रंग देणें झाला तरी एकसारखा सर्व शहरांत रंग देतात. शहरांत चहूंकडे नळाचें पाणी आणून सोय केली आहे. तसेच शहरभर धुराचे दिवे आहेत. शहरांत पुष्कळ ठिकाणीं सरकारी इमारती आहेत, तेथें तर फारच आरास केलेली असते. कोणत्यासालीं

* आमच्या देशाचें नष्टचर्य अजून संपलें नाहीं ह्मणूनच कीं काय कोण जाणें, सरकार उदारबुद्धीनें आपणास मसलतगार ह्मणून आपल्या कायदेकौन्सिलांत जे एतद्देशीय हुद्यानें, वयानें, योग्यतेनें, पैशानें वडे गृहस्थ मंत्री नेमते त्यांत कोणत्याही विषयावर निर्भिडपणें आपला खरा व स्वतंत्र अभिप्राव देणारे फारच थोडे आढण्यांत येतात. बहुतेक सरकारचा कल पाहून " माझें-ही मत असेंच आहे ' असें ह्मणणारे फार. एकटचाकरितांच असले मेंबर निवडून देण्याचा थोडा तरी अधिकार लोकांकडे असावा अशाविषयीं आजकाल राजकारण कुशल पुरुषांचें मनांत विचार येऊं लागले आहेत व त्या विचारास माजी लार्ड साहेब परममुत्सद्दी लॉर्ड डफ्रीन यांजकडूनही अनुमोदन मिळालें आहे. राष्ट्रीय सभासुद्धां दरसाल आपल्या ठरावांत वरील अर्थाचाच एक ठराव पसंत करीत असते. उपयोग होईल तो सुदिन !

कोणता रंग द्यावयाचा हें अगोदर सरकारांतून २ महिने कळवितात. एथें मोठी भक्कम तटबंदी आहे व त्या तटबंदीस चांदपोल, अजमीर, सवानेर, घाट, व अंबेर ( किंवा जवार सिंह दरवाजा ) असे पांच दरवाजे आहेत. ते रात्रीं ९ वाजल्यापासून सकाळचे ६ वाजेपर्यंत बंद असतात. यामुळें रात्रीं चोरी करून एकदम शहराबाहेर कोणासच जातां येत नाहीं. हा पोलिसास मोठा आधारच ह्मटला पाहिजे. रेल्वेंतून प्रवास करून आलेल्या उतारूंकरितां एथें पुष्कळ जागा आहेत. मुंबई शहरापेक्षांही जयपूर शहर फार टुमदार आहे. एथील प्रजा ब्रिटिश सरकारच्या प्रजेसारखी निःशस्त्र झालेली नाहीं. या शहरांतील सर्व रस्ते नेहमीं फार स्वच्छ राखलेले असतात. क्षेत्राच्या ठिकाणीं जसे उपाध्ये तसे या शहरांत "दलाल" फार आहेत. मुशाफर लोकांस हे दलाल पुष्कळ त्रास देतात. कांहीं तरी खरेदी करा अशी या लोकांची प्रवासी लोकांस फार भीड पडते. एथें एक उत्तम बाग आहे. ज्यास सामर्थ्य आहे अशा प्रत्येक मनुष्यानें हें शहर पहावें. एथील राजे साहेबांस १९ तोफांची सलामी आहे. पूर्वी १७ तोफांची होती.

हल्लीं हे राजे साहेब राज्यव्यवस्थेच्या संबंधानें सदासर्वकाळ उदासपणानें असतात. राज्यकारभार पोलिटिकल एजंट यांच्या धोरणानें चालतो, यामुळें रयत व नोकर काळजींत असतात. काम करून थकवा आल्यावर जसा एखादा पेनशन घेऊन स्वस्थ बसतो तसा प्रकार हल्लीं यांचा आहे. यांनीं "लेडी डफरीन फंडास" एकलाख

रुपये दिले आहेत. यांस "जी. सी. एस. आय." हा किताब इंग्लिश सरकारांतून मिळालेला आहे.

प्रकरण दुसरें समाप्त.

---

## प्रकरण तिसरें.

# जोधपूर अथवा मारवाड.

गिझनीच्या महंमदानें हिंदुस्थानावर स्वारी करण्याच्या पूर्वी शेंकडों वर्षें हिंदुस्थानांत ४ मोठमोठीं राज्यें होतीं. त्यांपैकींच कनोजनांवाचें एक राज्य होय. या राज्याचा शेवट इ० सन ११९३ स झाला. कनोजच्या शेवटल्या राजाचें नांव जयचंद असें होतें. ह्याचा जन्म राठोरकुळांत झालेला असून हा इंद्राच्या पृष्ठवंशाच्या ( पाठीवरचा कणा ) यापासून उत्पन्न झाला होता अशी पुष्कळ ठिकाणीं माहिती मिळते.

गोरीवंशीय बादशहा शहाबुद्दीन यानें हिंदुस्थानावर स्वारी केली, त्या वेळीं हा जयचंद्रराजा गंगा नदी उतरून जात असतां बुडून मृत्यु पावल्यानंतर कनोज राजधानींत हिंदु राजाचा अभाव झाला आणि गंगा नदीच्या पवित्र तीरावर राठोर राजाच्या नांवाचा घोष बंद झाला. यामुळें चहूंकडे उदास असें दिसूं लागलें.

पुढें १८ वर्षांनीं राजाजयचंदाचे दोन नातु—राजा शिवजी आणि सैत्रम—यांनीं आपली जन्मभूमि सोडून देऊन फिरत फिरत बिकानेरच्या पलीकडे २० मैलांवर कोलमंद म्हणून प्रदेश आहे तेथें येऊन

पोंचले, त्या वेळेस त्यांच्याबरोबर जिवासजीव देणारे असे २०० अनुयायी लोक होते. त्या वेळेस कोलमंदच्या लोकांबरोबर एका राजाची लढाई चालली असतां त्या शूर बंधूंनीं कोलमंदच्या लोकांस "तुमची इच्छा असल्यास आम्ही आमच्या लोकांसह तुम्हांस मदत करितों" असें सांगितल्यावरून त्या लोकांनीं यांजपाशीं मदत मागितली. नंतर हे दोघे राठोर कुलोत्पन्न भाऊ कोलमंदच्या रहिवासी लोकांस मिळाले व पुढें त्यांस जय मिळाला. या लढाईंत सैराम मृत्यु पावल्यानंतर कोलमंद प्रदेशाच्या राजानें या बंधुद्वयाचे उपकार स्मरून शिवजीस मोठ्या हुंड्या सहीत आपली कन्या दिली. तेव्हां शिवजीनें मोठ्या उमेदीनें आपला प्रयत्न तसाच पुढें चालविला. त्यानें नानाप्रकारचीं धाडसाचीं कृत्यें करून आणि कित्येक ठिकाणीं मोठ्या शौर्यानें लढून व पुष्कळ मोठमोठ्या अजब कल्पना योजून शेवटीं त्यानें लुनी नदीच्या वालुकाप्रचूर प्रदेशांत आपली विजय पताका नेऊन रोंवली. या धालमेलींत त्यास बराच मुलूख मिळाला.

शिवजी यास तीन मुलें होतीं. त्यांपैकीं वडील मुलगा अश्वत्थामा हा बापाचे मागून गादीवर बसला. त्यानें आपल्या दुसऱ्या भावास गुजराथच्या सरहद्दीवर मुलुख देऊन तेथें त्याच्या गादीची स्थापना केली. हा मुलगा आपल्या बापाप्रमाणेंच मोठा पराक्रमी होता. सर्वांत धाकटा भाऊ जो होता त्यास कोलमंद एथें गादीवर बसविलें. यानें बरींच वर्षें राज्य केलें. बाकीच्या दोन भावांची लिहिण्यासारखी विशेष कारकीर्द झाली नाहीं. हा मृत्यु पावला

तेव्हां त्यास ८ मुलें होतीं. या ८ मुलांकडे निरनिराळे अधिकार होते. त्यांपैकीं चौघांचें अजूनपर्यंत विद्यमान वंशज आहेत. त्याच्या मागून खटघट एथें त्याचा मुलगा दुहर हा गादीवर बसला. दुहर यानें आपल्या पूर्वजांचें मुख्य शहर जें कनोज तें जिंकून पुनः मंदूर जिंकण्याची पुष्कळ खटपट केली. परंतु त्यांत त्यास यावें तसें यश आलें नाहीं.

रायपाल, विरमदेव आणि दुसरे राजे यांणीं अनेक लढाया मारून पुष्कळ मुलुख जिंकून आपले राज्यास जोडला. विरमदेवानंतर त्याचा मुलगा चांद हा गादीवर बसला. त्यानें मारवाडची प्राचीन राजधानी मंदूर शहर दुसऱ्या राजांनीं जिंकिलें होतें, तें मोठ्या युक्तीनें शत्रूच्या ताब्यांतून परत घेतलें आणि राठोर राजाचें मुख्य शहर केलें. पुढें त्यानें नागोर आणि गोवद्दर हे दोन मुलूख जिंकून आपले ताब्यांत घेतले. आणि मंदूर एथून ज्या परराजांस हांकून दिलें होतें त्यांशीं विवाहसंबंध करून आपण जिंकून घेतलेल्या सर्व राज्यास निर्भयता संपादन केली. त्याला १४ मुलें होतीं. पैकीं चौघांचे वंशज अद्याप आहेत. हीं सर्व मुलें मोठीं पराक्रमी होतीं. लहानपणापासूनच त्यांनीं लढाया मारण्यास सुरवात करून मोठमोठीं शहरें काबिज केलीं होतीं.

इ० सन १४०२ त चांदराजा कपटानें मारला गेला. यावर त्याचा मुलगा राव रणमल्ल हा गादीवर बसला. राव रणमल्ल यानें मेवाडचा लाखाराणा यास यावज्जीव लढाईंत साह्य करून त्याचा मोठा विश्वासुक, व पहिल्या प्रतीचा दोस्त

होऊन राहिला. लाखाराणा मृत्यु पावल्यावर यानें मेवाडच्या राज्यकारभारांत हात घातला. परंतु त्यांत त्यानें कांहीं अयोग्य वर्तन केल्यामुळें त्यास मृत्युवश व्हावें लागलें.

उदेपूरचा इतिहास पाहिला असतां असें दिसून येतें कीं, राव रणमलची मुलगी हंसा तिचा मुलगा जो मुलकजी त्याला राज्य देऊन लाखाराण्याचा मुलगा चांद हा कांहीं वर्षें राज्य करून नंतर राज्यसुखपरावृत्त झाला. लाखाराणा मृत्यु पावल्यावर चांद यानें आपल्या धाकट्या भावाचें रक्षण करण्याचें काम पत्करिलें. चांद हा राज्यकारभार करीत असतां, राव रणमल यानें सर्व राज्यसूत्र राठोरच्या घराण्याकडे ठेवावें या हेतूनें मेवाडच्या मनोहर हिरव्या गार शेतावर टोळधाडीप्रमाणें आपले बंधुजन नेऊन चाल केली, व चांदच्या भावास ठार मारून धाकट्या राण्यासही जिवें मारण्याच्या बेतांत होते. परंतु अशा आणि बाणीच्या प्रसंगीं चांद हा एकदम राठोर लोकांवर तुटून पडला, आणि सपाट्याबरोबर राव रणमल यास ठार मारून त्याच्या सर्व योध्द्यांची दाणादाण केली.

या धांदलींतून राव रणमलचा एक मुलगा जोंदा हा मात्र मोठ्या शर्थीनें बचावला. त्याला आतां आपलें मंदूर शहर मिळणें ह्मणजे मोठें दुर्घट काम आहे असें वाटलें. राठोर लोक आतां सर्वस्वास मुकलेसे दिसूं लागलें. असा भयंकर व अपरिहार्य प्रसंग राठोर लोकांवर येऊन पडला. परंतु हा बचावलेला जोंदराजा अशाही प्रसंगीं भिणारा मनुष्य नव्हता. तो मोठा खोल मनाचा असून चांगला राजकारस्थानी होता. त्यानें आपले हेतु गुप्त ठे-

वून प्रथम आपल्या पक्षाचे कांहीं लोक चाकरीस ठेविले, व त्याच्या साह्यानें मंदूर एथें चांदाच्या दोन मुलांस कैद करून एकास तर तेथेंच हाल करून ठार मारलें. हें पाहून राहिलेल्या दुसऱ्या मुलानें जोंदराजाबरोबर त्याच्या ह्मणण्याप्रमाणें तह करण्याचें कबूल करून आपला धाकटा भाऊ ज्या ठिकाणीं समरांगणांत पडला होता तेथपर्यंतच आपले राज्याची सीमा कबूल करून भावाच्या रक्ताबद्दल असें नुकसान सोसण्यास गोंडवार प्रांत देण्याचें त्यानें कबूल केलें. तेव्हां सर्व तंटा मिटला.

जोंद हा मोठा मतलबी आणि राजकारस्थानपटु होता. याचा असा हेतु असे कीं, शुष्क लढाया करण्यांत आयुष्याचा व्यय करण्यापेक्षां आपल्या राज्याचीच चांगली व्यवस्था करावी. या हेतुनुरूप त्यानें मोठमोठ्या जमिनी रयतेस वंशपरंपरा लावून दिल्या. इ० सन १४५९ त त्यानें आपल्या नांवाचें ' जोधपूर ' हें नवें शहर वसविलें. त्यानें रयतेची चांगली आबादानी केली. तो इ० सन १४८९ त मृत्यु पावला. त्या वेळेस त्याचें वय ६३ वर्षांचें होतें. त्याला मोठीं शूर अशीं १४ मुलें होतीं. त्याच्या मागून सुराजमल्ल हा गादीवर बसला. यानें २१ वर्षें राज्य केलें. याजमध्यें शिवजीचे कांहीं गुण वसत होते. याला ५ मुलें होतीं. हा मृत्युपावल्यावर त्याच्यामागून गंग हा गादीवर बसला; पण तो लवकरच मृत्यु पावला. त्याच्या मुलाचें नांव ही गंगच होतें. त्यानें आपला चुलता सायाशी याशीं लढाई करून गादी मिळविली. हे सर्व राजे मोठे पराक्रमी होते व यांच्या कारकीर्दी रयतेस फार प्रिय झाल्या होत्या.

गंगराजाच्या कारकीर्दींत मुसलमान लोकांनीं राठोरच्या राज्यांत स्वारी करण्यास आरंभ केला. मेवाडचा राणा संग याच्या हाताखालीं मुसलमानांवर त्यांनीं पुष्कळ जय मिळविले. परंतु एके लढाईंत त्याचा पराभव झाल्यामुळें बाबरच्या सत्तेपुढें त्यांचें कांहीं चालेनासें होऊन त्यांस मुसलमानांचें वर्चस्व कबूल करावें लागलें. इ० सन १५३२ त गंग मृत्यु पावला आणि त्याचा मुलगा मालदेव हा गादीवर बसला. हा मोठा शूर, पराक्रमी, योद्धा असून उत्तम राजकारस्थानी आहे अशी कीर्ति झाली. त्यानें अमीर आणि नागोर प्रांत गेले होते ते लढाया करून आपले ताब्यांत घेतले. आपल्या सरहद्दीवरच्या प्रदेशांत त्यानें लढाया मारून जय मिळविले. सारांश, त्यानें आपला क्षात्रधर्म जो लढाई करणें तो पूर्णपणें बजाविला. परंतु इतक्यानेंच त्याची तृप्ति झाली नाहीं. या वेळेस कांहीं कारणानें परराज्यसंबंधीं तंटे सुरू झाले होते व त्याबद्दल कोणीं एकानें मालदेवाचे मनांत संशय उत्पन्न केला होता. मालदेवाच्या मनांत त्याच्या पराक्रमी योध्द्यांविषयीं असा संशय आल्यानंतर त्यानें त्या वेळेस हल्ला करण्याचें माघारें घेतलें. खरोखर या वेळेस जर मालदेवानें हल्ला केला असतां, तर शिरशाहाच्या सैन्याची अगदीं धूळधाण उडून गेली असती. ज्या लोकांविषयीं मालदेवाला हे फितूर आहेत असा संशय आला होता, त्या लोकांनीं त्या संशयाचा खोटेपणा व आपला विश्वासूपणा दाखविण्यासाठीं आपापल्या हाताखालच्या शिपाई लोकांस घेऊन शिरशहाच्या छावणीवर हल्ला केला व एकसारखी चाल करून एखाद्या वावटळीप्रमाणें दंगल

उडविली व थेट बादशहापर्यंत जाऊन भिडले; परंतु बादशहाजवळ सैन्य फार असल्या कारणानें त्यांचा निरुपाय होऊन त्यांस अपयश आलें. आतां मालदेवास शरण जाण्याखेरीज दुसरा उपाय राहिला नाहीं, असें त्यांस होऊन गेलें. एकदां दैव हात धुवून पाठीस लागलें ह्मणजे तें त्या मनुष्याचा पिच्छा पुरविल्याशिवाय रहात नाहीं असें जें ह्मणतात तें अगदीं खरें आहे. हुमायून बादशहास शिरशाहानें हाकून लाविल्यावर तो मालदेवाकडे आश्रय मागावयास आला. मालदेवानें त्यास आश्रय देण्याचें नाकारिलें. पुढें त्याच हुमायुनास दैव अनुकूल होऊन त्यानें आपली दिल्लीची गादी पुनः मिळविल्यावर त्याचा मुलगा अकबर यानें, ज्या प्रदेशांतून आपल्या बापाला आपत्कालीं साह्य न मिळतां हाकून दिलें होतें, त्याच मालदेवाच्या मुलुखावर स्वारी करून मालदेवास अगदीं जेरीस आणून सोडलें.

इ० सन १५६१ त अकबरानें मारवाड देशावर स्वारी करून मालकोट आणि नागर हीं दोन शहरें आपले ताब्यांत घेऊन तीं दुसऱ्या एका हिंदुराजाच्या स्वाधीन केलीं. नंतर ८ वर्षें लढाया वगैरे होऊन मालदेवास तहाचें बोलणें लावणें भाग पडलें. बादशहापाशीं स्वतः जाऊन तह करणें मालदेवास मरणापेक्षां फार दुःख वाटल्यामुळे स्वतः जाऊन तह करायाचाच नाहीं, असा निश्चय केला, व त्या कामासाठीं त्यानें आपला दुसरा मुलगा चंद्रसेन याला आपल्या तर्फेनें तहाचें बोलणें करण्यास पाठविलें. हें पाहून अकबरास फार राग येऊन त्यानें तावडतोब जोधपूरचें राज्य रायसिंग नांवाच्या एका हिंदुराजाच्या

स्वाधीन केलें. याच राजास पूर्वीं सांगितलेलीं मालकोट आणि नागोर हीं शहरें अकबरानें दिलीं होतीं. मग काय विचारतां तुमुल युद्ध आरंभिल्यावांचून टिकाव नाहीं असा प्रसंग प्राप्त झाला.

राठोर वंशीय ह्याताऱ्या मालदेवानें आपल्या राजधानीस वेढा पडलेला पाहून मोठ्या शौर्यानें तिचें रक्षण करण्यास कमर बांधली; परंतु बादशहाचें सैन्य फार ह्मणून त्याचें कांहीं न चालतां शेवटीं उदयसिंगाकडून तह करविणें भाग पडलें. उदयसिंगाचा भाऊ चंद्रसेन यानें बादशहा-समोर १७ वर्षें टिकाव धरला होता. बादशहानें अश्वत्थाम्याला आपल्या पक्षास मिळवून घेण्यासाठीं पुष्कळ प्रयत्न केले. परंतु तो किंवा मालदेवाचे कुटुंबांतील कोणतेंही मनुष्य किंवा लहानसा नौकरसुद्धां बादशहास वश * झाला नाहीं. शाबास आहे त्यांची! असे दृढ मनाचे स्वामिभक्ति-परायण असे मोहरे ज्या देशांत असतात त्या देशांत शत्रूचें कांहींएक चालत नाहीं. चंद्रसेन लढतां लढतां मृत्यु पावला हें ऐकून ह्यातार्‍या मालदेवास फारच वाईट वाटलें, व याच काळजीनें तो इ० स० १५७३ त मृत्यु पावला.

* असे इमानी नौकर ज्याच्या पदरीं आहेत त्याला कशाचीच भीति बाळगावयास नको. मोठमोठे पगार देऊन विश्वासाच्या कामावर नेमलेल्या अधिकाऱ्यांनीं पैशाला भुलून स्वामिद्रोह केल्याचीं उदाहरणें इतिहासांत बरींच आढळतात. सातारा, नरगुंद वगैरे राज्यें खालसा करण्याच्या कामीं बडे नौकरच अग्रणी होते. वाईट गोष्ट कधीं करूं नये, व केलीच तर 'आपण केलें तें बरोबर आहे' असें आढ्यतेनें सांगून आपल्याविषयीं लोकांत नाचक्की करून घेऊं नये.

त्याला ४ मुलें होतीं. त्यांपैकीं तिसरा मुलगा उदयसिंग हा त्याच्यामागें गादीवर बसला.

उदयसिंगाचे कारकीर्दींत मारवाडचा स्वातंत्र्यसूर्य अस्तास गेला. त्यानें मुसलमानांचें सार्वभौमत्व कबूल केलें. व परम निर्मल अशा क्षत्रियकुलचंद्रास राहुरूपी यवन जातीय राजास आपली कन्या देऊन यानें कलंक लाविला. ह्मणजे त्यानें आपली बहीण जोदाबाई ही फार च स्वरूपवान् अशी होती, तिचें लग्न अकबर बादशहाशीं लाविलें. बरें, लाविलें तर लाविलें पण त्यांत तरी रीतीप्रमाणें यानें कांहीं वरदक्षिणा द्यावयाची होती ती मुळींच न देतां उलटें अकबराकडून त्यानें मारवाडच्या ज्या ज्या मुलखांचा अपहार केला होता ते सर्व मुलूख परत मिळविले. यांत अजमीर मात्र बादशहानें त्यांस परत दिलें नाहीं. याशिवाय अकबरानें आपल्या पदरचे माळव्यांतील मोठमोठे सुपीक आणि धनद असे प्रांत दिले, त्या योगानें उदयसिंगाच्या राज्याचें उत्पन्न दुप्पट वाढलें.

उदयसिंगानें, अकबराच्या मदतीनें आपल्या सरदार व जमीनदार लोकांची सत्ता कमी करून लहान लहान शेतकऱ्यांस जमिनीचे सारे कमी करून धान्याचाही पुष्कळ पुरवठा केला. त्यानें १४००० लोकांची वस्ती नवीन वसविली व त्या सर्वांस घरेंही बांधून दिलीं. ही जी उदयसिंगास अकबरानें मदत केली त्याबद्दल उदयसिंगानें बादशहास उत्तम कवाइत शिकविलेलें व लढाईस तयार असें पुष्कळ सैन्य मदतीस दिलें.

मालदेवानंतर उदयसिंग ३३ वर्षे राज्य करीत होता. त्याला ३४ औरस पुत्र होते, त्यांपैकीं वडील सूरसिंग हा त्याच्या मागून गादीवर बसला. सूरसिंग हा मोठा पराक्रमी व शूर योद्धा होता. सूरसिंग याला, त्याचे वडील मृत्यु पावले ही बातमी तो "लाहोरास बादशहाच्या सैन्यावर अभिषिक्त असतां" कळली. अकबराची सूरसिंगावर बहाल मर्जी होती. सूरसिंगानें ही मर्जी बसण्यास योग्य असे पुष्कळ मोठमोठे पराक्रम आणि युद्धकौशल्य दाखविलें होतें. हा मोठा पराक्रमी आहे असा अकबरास पूर्ण भरंवसा होता म्हणून त्यानें त्यास परत येतांना राजपुतान्यांतील शिरोही म्हणून एक शहर होतें तेथला राजा अकबराचें सार्वभौमत्व मान्य करीत नव्हता म्हणून त्या शहरावर चाल करण्यास सांगितलें होतें. या राजधानीभोंवतीं सगळा पर्वतप्राय मुलूख होता तरी यानें बादशहाचें काम फत्ते करून शिरोहीचा मुलूख काबीज केला. पुढें गुजराथ देशाच्या राजावर स्वारी करून धमदुकान एथल्या लढाईंत त्याचा पराभव करून तो सर्व मुलूख जिंकून आपल्या ताब्यांत घेतला,

अकबर मृत्यु पावल्यावर त्याचा मुलगा जहांगीर यास भेटण्यासाठीं सूरसिंग दिल्लीस गेला. या वेळीं त्याचा मुलगा गजसिंग हा त्याच्याबरोबर होता. राजानें आपल्या मुलाच्या हातांत एक तरवार दिली होती. ती अशाकरितां कीं, ती पाहिल्याबरोबर त्याच्या झेलोरच्या पराक्रमाची आठवण व्हावी. या तरवारीपासून त्यास पुष्कळ ठिकाणीं यश आलेलें होतें म्हणून तो ती नेहमीं आपल्याबरोबर घेऊन फिरे.

या राजानें पुष्कळ द्रव्य खर्च करून आपल्या राजधा-

नीच्या शहरास फार शोभा आणविली होती व त्यांत लोकोपयोगाकरितां पुष्कळ इमारती बांधिल्या. मोंगलबादशहाशीं चाकरीच्या नात्यानें वागणें हें त्याला मनापासून आवडत नसे, व ह्मणून तो नेहमीं या चाकरीबद्दल तिरस्कार दर्शवी. त्यानें मरणापूर्वी एका खांबावर "आमच्या वंशांपैकीं कोणी पुरुष नर्मदानदी उतरून पार जाईल तो जळून भस्म होईल" अशीं शापाक्षरें खोदून ठेविलीं होतीं. हा राजा इ० सन १६०० त मृत्यु पावला. याला ६ मुलगे आणि ७ मुली होत्या.

त्याच्या मागून गजसिंग हा गादीवर बसला. यावर बादशहाची मोठी प्रीति होती व त्यानें त्यास दक्षिणेचा सुभेदार नेमिलें होतें. हाही बापाप्रमाणेंच मोठा शूर, बुद्धिमान् आणि तारतम्यज्ञानीनिपुण असा होता.

प्रिन्स खुर्म अथवा शहाजहान यानें आपला वडील भाऊ खुसरू याला दिल्लीचें तक्त न मिळतां तें आपणास मिळावें ह्मणून बंड केलें, व गजसिंग याजकडे मदत मागितली. ती गजसिंगानें दिली नाहीं. पुढें कांहीं दिवसांनीं त्याच्या एका मित्रास खुर्मच्या हुकमावरून कोणी एकानें ठार मारिलें. तें पाहून त्यानें बादशहाच्या सैन्यांतील चाकरी सोडून देऊन स्वस्थ येऊन तो घरीं बसला. पुढें कांहीं दिवसांनीं खुसरू मृत्यु पावला तेव्हां अर्थात् शहाजहानाचें अर्धें काम सिद्दीस गेलें. परंतु राज्यतृष्णा* बलवत्तर

---

*महत्वाकांक्षा ही इतर लोकांपेक्षां राजेलोकांत अधिक वसत्ये कीं काय कोणजाणें ती साधी एखादे वेळीं ते कोणतेंहि नीच काम करण्यास भमूची किंवा लोकलज्जेची चाड बाळगीत नाहींत.

असल्यामुळें खुर्म ऊर्फ शहाजहान यानें आपल्या बापास पदभ्रष्ट करण्याचा बेत केला. तेव्हां जहांगीर यानें या आपल्या घरगुती तंट्यांत आपणास मदत करण्यासाठीं सर्व रजपुतांची मदत मागितली.

बादशहाच्या विनंतीप्रमाणें जोधपूर, जयपूर, कोटा, आणि बुंदी, या ठिकाणच्या राजांनीं एकत्र होऊन त्या बंडाचा फडशा उडवून दिला. बनारस एथें लढाई होण्याच्यापूर्वीं जेव्हां बादशहाची आणि या मदत करणाऱ्या रजपूतराजांची गांठ पडली तेव्हां बादशाहास जोधपूरचा राजा गजसिंग याचा अतिशच उत्कंठा पाहून इतका आनंद झाला कीं, त्यानें त्या वेळेस नेहमींच्या रीतीप्रमाणें त्याच्या हातास नुसता हात न लावितां प्रेमानें त्याच्या हातांचें चुंबन केलें. राजा गजसिंग याचा वडील मुलगा अमर याचा स्वभाव त्याच्या बापास आवडत नसे. व हा राज्यास अयोग्यही होता. यामुळें राजागज यानें मरणापूर्वीं असें लिहून ठेविलें होतें कीं, माझ्यामागें अमर यास गादीवर बसूं देऊं नये. तो गादीवर बसण्यास योग्य नाहीं. कारण तो मगरूर व उद्धट असल्यामुळें रयतेस क्रूरपणानें वागवील. पुढें एके वेळीं राजा गज हा बंडवाल्यांचा मोड करण्याकरितां गुजराथेंत गेला असतां तेथें बंडवाल्यांनीं इ० सन १८३८ त त्यास कपटानें ठार मारिलें.

यशवंतसिंगाची नजर स्वतःच्या फायद्याकडे फार होती. त्याला वाटेल तेव्हां वेळ पाहून तो प्रसंगानुसार वागे. त्यानें जीं जीं कारस्थानें केलीं त्या सर्वांचा हेतु एकच होता. तो हा कीं, आपल्या देशाचे शत्रु जे मुसलमान लोक त्यां-

त्यामध्यें आपआपसांत तंटे लावून त्यांच्या नाशापासून आपले देश बांधव जे हिंदु लोक त्यांना मुक्त करावें. हा राजा मोठा राज्यकारस्थानी असून विद्वानांचा आश्रयदाता, मोठा पराक्रमी, महाशूर, योद्धा, मोठा राजनीतिविचक्षण आणि रजपूतकुलदिनमणी असा होता. यानें पुष्कळ महत्वाचीं अशीं कामें केलीं आहेत. मारवाडांत व मारवाडचे आसपास ५० कोसपर्यंत सर्व लोक याची फार वाखाणणी करितात.

इ० सन १६३८ त हा गादीवर बसला. त्या वेळेपासून तों इ० सन १६५८ पर्यंत ह्मणजे २० वर्षे तो दक्षिणेंत औरंगजेबाच्या हाताखालीं होता. इतक्या अवकाशांत यानें बादशहाचीं पुष्कळ कामें केलीं होतीं. इ० सन १६३८ त दिलीस बादशहा आजारी पडला तेव्हां बादशहाचें व यशवंतसिंगाचें कांहीं कारणानें वांकडें पडलें. यामुळें दोघे ऐकमेकांस शत्रूप्रमाणें पाहूं लागले.

यशवंतसिंगास कपटानें ठार करण्याकरितां बादशहानें पुष्कळ प्रयत्न केले; परंतु यशवंतसिंगाच्या शाहणपणापुढें बादशहाचें कांहींएक चालेना. बादशाहानें आपण होऊन जेव्हां असें नीच काम करण्यास सुरवात केली तेव्हां यशवंतसिंगानें त्याचा मुलगा दारा यास आपल्या बापाविरुद्ध वागण्याविषयीं फूस दिली.

बादशहाचा मुलगा दारा हा आपल्या बापाच्या वतीनें त्या वेळीं राज्यकारभार पहात असे. दाराच्या मनांत राज्यकारभाराचीं सूत्रें पुन्हा बापाचे हातीं देऊं नये असें होतें, ह्मणून चहूंकडे आपलाच अंमल चालावा एतदर्थ त्यानें

यशवंतसिंगास आपल्या पक्षाकडे घेऊन त्याला एकदम माळव्याचा सुभेदार नेमिलें. व हें काम यशवंतसिंगानें आनंदानें पत्करलें. पुढें बादशहाच्या प्रकृतीस आराम वाटला व आपण आजारी असतां आपल्या मुलानें केलेलें कपटही त्याला कळलें. औरंगजेबानें युक्तीयुक्तीनें आपली सत्ता वाढवून नंतर माळव्यांत यशवंतसिंगावर स्वारी केली व उज्जनीनजिक १६ मैलांवर फत्तेगांव ह्मणून खेडें आहे तेथे यशवंतसिंगाचा पराभव केला.

यशवंतसिंगाचा पराभव केल्यानंतर लवकरच औरंगजेबानें दाराचाही पराभव करून त्यास गादीवरून हाकून लावून आपण बादशहा झाला. नंतर औरंगजेबानें यशवंतसिंगास त्याच्या अपराधाची क्षमा करून "सुजाशीं लढण्यास मजबरोबर ये" असा निरोप पाठविला. यशवंतसिंगानें ती आज्ञा शिरसामान्य केली. यशवंतसिंग मनांत एकसारखा धडपडत होता. सुजा आणि औरंगजेब यांची लढाई चालली असतां सुजाशीं संगनमत करून त्यानें औरंगजेबावर वर्षाव सुरू केला. यशवंतसिंगाच्या मनांत दारास मदत करावी असें होतें. परंतु औरंगजेबानें दाराचा पराभव केल्यावर तो बराच लांब पळून गेला. इकडे यशवंतसिंग जोधपुरास निघून गेला. त्यानें तेथें लूट केलेली वगैरे जिनगी सर्व घरीं ठेवून दाराची मसलत घेतली. औरंगजेबास रजपूत लोकांचें मोठें भय असे. औरंगजेबानें यशवंतसिंगास तुमचे अपराधाची क्षमा करून तुमचा गुजराथ तुह्मास देतों. फक्त तुह्मी झाल्या गोष्टींची

क्षमा केली असें ह्मणा असें सांगितलें असतां त्यानें ती कोणचीच गोष्ट मान्य केली नाहीं.

दारा अगदीं अनाथ झाला. तो औरंगजेबाच्या अगदीं ताब्यांत आला. परंतु यशवंतसिंगाच्या मनांत मुसलमानाविषयींचा तिरस्कार आला होता तो अगदीं लेशमात्र कमी झाला नाहीं. यशवंतसिंगास दक्षिणेंत जाऊन फार दिवस झाले नाहींत तोंच त्यानें शिवाजीशीं मसलत करून शाइस्तेखानास मारण्याचा बेत केला, आणि औरंगजेबाच्या मुलास गादीवर बसवून द्वाही फिरविण्याची मसलत केली. औरंगजेबास हें सर्व कळलें होतें. परंतु तें त्यानें कोणालाही कळविलें नाहीं. प्रथम त्यानें आपल्या सर्व शत्रूंचा बंदोबस्त करून स्वस्थ बसला. नंतर जयपूरचा राजा जयसिंग यास यशवंतसिंगाच्या जागीं बसविलें. औरंगजेबास हा मोठा बलाढ्य, महापराक्रमी व शूर असा शत्रू जो यशवंतसिंग हा केव्हां आकाश पाताळ एक करून सोडील कोण जाणें अशी मोठी भीति पडली होती. यानें यशवंतसिंगाचा सूड उगवावा ह्मणून हरएक युक्ति योजिल्या परंतु त्या धूर्तापुढें त्याचें कांहींएक चाललें नाहीं. नंतर औरंगजेबानें त्याला दूर अंतरावर पाठविण्याचा निश्चय केला. दैववशात त्याच वेळेस काबुलास एक मोठें भयंकर बंड उद्भवलें होतें. तें बंड मोडण्यासाठीं औरंगजेबानें यशवंतसिंगाची काबुलास नेमणूक केली. यशवंतसिंगानें आपले पितृपरंपरागत राज्याची व्यवस्था पृथुराज याजवर सोंपवून काबुलास बंड मोडण्यासाठीं निघून गेला.

यशवंतसिंग हा काबुलास जाऊन पोंचतो न पोंचतो

इतक्यांत औरंगजेबानें यशवंतसिंगाच्या कुटुंबाचा नाश करण्यास सुरुवात केली' त्यानें पृथुराजास दरबारांत बोलावणें पाठविलें. तो आल्यावर त्याचा मोठा सन्मान करून त्यास एक पोषाख बक्षीस दिला. तो पोषाख विषदिग्ध होता. बादशहासमोरच पृथुराजानें तो पोषाख अंगावर घातला आणखी थोडक्याच तासांत अत्यंत दुःसह वेदना भोगून तो तेथेंच मृत्यु पावला.

यशवंतसिंगास त्याच्या मुलाच्या मृत्यूची बातमी कळतांच त्याचें देहभान नाहींसें झालें. आपला शत्रु अशा प्रकारचें अधम कृत्य करील असें त्याला वाटलें नव्हतें. त्याचवेळेस त्याचे दोन शूर मुलगे काबूलची हवा न मानल्यामुळें मृत्यु पावले. यामुळें तर आतां यशवंतसिंगाच्या दुःखास अंत नाहींसा झाला. शेवटीं यशवंतसिंग पुत्रशोकानें मृत्यु पावला. तो मृत्यु पावला तेव्हां त्याची बायको सात महिन्याची गर्भिणी होती, तिला पुढें मुलगा झाला. त्याचें नांव अजितसिंग असें ठेविलें. आपल्या कुटुंबाचा औरंगजेबानें समजून उमजून घात केला व कदाचित् तो मलाही मारील या भितीनें तिनें सर्व दुःख एकीकडे ठेवून आपलें व आपल्या मुलाचें संरक्षण व्हावें ह्मणून जलदी करून ती मुलासह सुखरूप आपल्या घरीं गेली. यशवंतसिंगाची बायको व मुलगाही सुखरूप घरीं आहेत असें समजतांच त्यांनाही मारण्याचा यानें निश्चय करून औरंगजेबानें मुलगा आमच्या स्वाधीन करा ह्मणून बोलणें लाविलें. औरंगजेब मोठा बलाढ्य असल्यामुळें त्याला नाहीं ह्मणतां येईना. अशा भयंकर समयीं राणी-

जवळ दुर्गादास ह्मणून एक विश्वासु मनुष्य होता, त्यानें अशी युक्ति काढिली कीं, मुलास व राणीस लांब पाठवून त्या मायलेकरांच्या जागीं एक बाई व एक मुलगा आणून ठेविला. पुढें बादशहानें या मायलेकरांस घेऊन गेल्यावर यशवंतसिंगाची बायको व मुलगा हीं नव्हेत. ही बायको व हा मुलगा अशीं दुर्गादासानें बनावट केली असें बादशहास वाटल्यावरून बादशहानें या मायलेकरांस आपल्या ताब्यांत ठेवून यशवंतसिंगाची खरी बायको व मुलगा पाठवून द्या असें रजपूत लोकांकडे मागणें केलें.

रजपूत लोकांनीं राणी व मुलगा तुह्मांस मिळणार नाहीं असें निकरानें बादशहास कळविलें. त्यावरून खरो- खर रजपुतांच्याच ताब्यांत राणी व मुलगा आहे अ- शी बादशाहाची खात्री झाली. रजपूत लोकांस धमकी देऊन मुलगा व राणी आणवावी असें बादशहास वाटून त्यानें स्वतः आपले स्वार व शिबंदी घेऊन मुलास आण- ण्याकरितां गेला. रजपूत लोकांनीं आपले राज्याचें व राणीचें आणि मुलाचें नखसुद्धां तुह्मांस दिसणार नाहीं ह्मणून सांगितलें. अवरंगजेबाबरोबर रजपूत मोठे जिवावर उदार होऊन लढले. हजारो रजपूत लढाईंत मारिले गेले. यानंतर बादशाहास त्यांची युक्ति कळली, पण त्याचा उप- योग काय ? राणी व तो मुलगा जोधपूरास निघून सुद्धां गेले असें समजलें. अवरंगजेब मोठा चतूर होता. त्याला ही गोष्ट कळली असून जणूं काय आपण त्या विषयीं अ- ज्ञानच आहों जसें दाखऊन पुढें पुष्कळ दिवस त्यानें जोधपूरच्या राजाच्या वंशांतील ह्मणून ज्या मुलास धरि-

ले होतें त्याला जोधपूरच्या राजवंशा प्रमाणें वागविलें.

स्वामीभक्तिपरायण व महान् स्वदेशभक्त जो दुर्गादास हा फार जलदीनें जोधपुरास गेला आणि अवरंगजेबाशीं लढाई करण्याच्या तयारीस लागला. पुढें मुसलमानाशीं लढाया सुरू झाल्यावर बरेच काळपर्यंत मुसलमाना पुढें त्याचें कांहीं एक चाललें नाहीं. त्यांनीं सर्व देश उध्वस्त केला. खेडीं जाळलीं, आणि बायकापोरें धरून नेलीं. याशिवाय आणखी दुसरी एक लढाई झाली, तींत मुसलमान आणि जोधपूर यांच्यामध्यें फारच स्नेहसंबंध होता. तो अगदीं तुटून गेला. ही जी एकदां मुसलमान आणि जोधपूर यांची फाटाफाट झाली ती पुनः कधीं जुळली नाहीं.

दुर्गादास यानें अवरंगजेबाचा मुलगा अकबर यास आपल्याकडे फितूर करून घेतलें. नंतर अकबरानें मीं बादशाहा ह्मणून द्वाही फिरविली. या गृहकलहांत अकबराचें कांहीं एक चाललें नाहीं. या गृहकलहापासून राजपुतान्यांस फार फायदा झाला. जोधपूर आणि अवरंगजेब यामधील लढाया इ० सन १७०७ त अवरंगजेब मृत्यु पावला तोपर्यंत चालल्या होत्या.

अवरंगजेब मृत्यु पावण्यापूर्वीं अजितसिंग मोठा शूर होता तरी आपल्या राजधानींत त्याच्यानें प्रवेश करवला नाहीं. तरी पुढें त्यानें आपली राजधानी आपले स्वाधीन करून घेतली. आणि आपल्या शहाणपणानें जोधपूरची गतराज्यश्री पुनः टवटवीत केली. मुसलमान बादशाहास रजपूत राजेलोकांनीं आपणास कन्या द्याकात अशा प्रकारचे

हुकूम करण्यास जेव्हां आरंभ केला, तेव्हां जोधपूर उदेपूर, जयपूर व आणखी मोठमोठे राजे या सर्वांनीं असा निश्चय केला कीं, इतःपर रजपूत राजांनीं आपल्या मुली मुसलमानांशीं देऊन विवाहसंबंध करावयाचा नाहीं; असा निश्चय करून त्यांनीं एकमतानें मुसलमानास सांगितलें.

बादशहाचे हातून मृत्यु न पावतां व मोठमोठीं संकटें भोगलीं व ज्याच्या प्राणरक्षणाकरितां हाजारों रजपूत प्राणास मुकले तोच हा जगत्सिंग होय. याची शारीर आणि मानसिक अशा दोन्ही शक्ति मोठ्या जबरदस्त व बळकट होत्या. शूर पुरुषांचा मुलगा, त्यांतून काबूल सारख्या हिममय प्रदेशांत त्याचा जन्म, त्यांत लहानपणापासून विपत्तींत काळ काढलेला, यांमुळें गरीब रीतीच्या स्थितीचा त्यांस पूर्ण अनुभव असल्या कारणानें आपल्या देशास मुसलमानाच्या दास्यत्वापासून मुक्त करण्याचा त्याचा एक पूर्ण हेतु होता. व जर मीं आपल्या देशबंधूस या परकीय लोकांच्या जाचांतून सोडवीन तरच माझ्या जन्माचें सार्थक होईल असें नेहेमीं त्याच्या मनांत वागत असे.

मुसलमान लोकांचें नांव ऐकिलें कीं याच्या आंगाचा तिळपापड होई. हा द्वेषभाव त्यास पितृपरंपरागत होता. आणि हा शत्रूचा सूड उगविण्याची एकही संधी व्यर्थ दवडित नसे. ज्या वेळेस प्रसंग येई त्या त्या वेळेस त्यानें आपला हात साधून घेतलाच. मुसलमानांचा त्यानें पुष्कळ वेळां पराभव केला. परंतु शत्रूच्या सैन्याची रजपूत सैन्याबरोबर लढण्याची प्राज्ञा नव्हती. रजपुतांचें सैन्य पहाण्याबरोबर मुसलमानांचें सैन्य भिऊन पळून जात असे. यानें स्वदेशबं-

धूंस यवनांच्या जाचांतून मुक्त केलें. मुसलमानांची जरी एवढी मोठी प्रबळ सत्ता होती तरी त्यास जोधपुरच्या राजाचें नांव ऐकिलें ह्मणजे त्यांच्या आंगाचा थरकांप होई. हा क्षत्रिय कुलोत्पन्न व स्वधर्माभिमानी यवनसत्तासहिष्णू असा होता. आह्मांस केव्हां रसातळास नेऊन पोंचवील याचा नेम नाहीं हें नेहमीं यवनांच्या मनांत वागत असे.

समरांगणांत लढून रजपूतलोकांबरोबर कांहींएक चालणार नाहीं असें पाहून दिल्लीच्या दरबारच्या मुत्सद्यांनीं खऱ्या शूरास कलंक लावणारे उपाय योजण्याचा निश्चय केला. जगत्सिंगाचा मुलगा अभिसिंग यास यवनांनीं गांठून त्यास राज्यलोभ दाखवून सांगितलें कीं, तूं आपल्या बापास ठार मारशील तर तुला आह्मी गुजराथचा सुभेदार करूं, अशी आशा दाखविली. त्या क्षात्रकुलनराधमानें तें नीच कर्म करण्याचें कबूल करून तो पितृहत्या कशा रीतीनें करावी या विचारांत कांहीं दिवस स्वस्थ होता. मुलानें आपल्यासारखें राजकुशल असावें असें अजितसिंगास वाटत असे, पण मुलाचा हेतु निराळाच होता तो याला काय बरें माहीत! अजितसिंग हा नेहमीं दुपारच्या वेळेस फराळ करी हें या नीच कर्म करणाऱ्या पुत्रास माहीत होतें. यानें एके दिवशीं संधि साधून लाडूंत विष घातलें व तो लाडू अजितसिंगानें खातांच आपणास कोणीं विष घातलें आहे असें तो ह्मणत असतां त्याच्या सर्वांगाची आग होऊन तो इ. सन १७३१ त मृत्यु पावला.

इ० सन १७३१ त पितृहत्या करणारा अभीसिंग हा

गादीवर बसला. त्याची सर्व कारकीर्द त्याचा बंधु बखतसिंग याच्याशीं कलहांतच गेली. याला प्रजा फार नाखुष होती. बखतसिंग मोठा आळशी, विषयी, आणि क्रूर, असून त्यास अफूचें व्यसन फार होतें. त्यानें विनमल्ल, सांचूर वगैरे प्रांत मारवाडचे राज्यास जोडले.

इ. सन १७५० त अभीसिंग यांस बखतसिंगानें कपटानें ठार मारलें. त्याचेमागून अभीसिंगाचा पुत्र रामसिंग हा गादीवर इ० सन १७५१त बसला त्या वेळेस त्याचें वय ११ वर्षांचें होतें. त्याचा स्वभाव मोठा तामसी व उद्धट असे. तो गादीवर बसतवेळेस त्याचा चुलता बखतसिंग यानें त्याचा थोडासा अपमान केला होता, त्यावरून त्यानें आपल्या चुलत्याचे जाहागिरचें सर्व उत्पन्न बंद केलें; आणि सैन्यासह आपला हुकूम बजाविण्यास चालता झाला. परंतु त्यांत त्याचा पराभव होऊन तो राज्यभ्रष्ट झाला. अशी त्याची अवस्था होतांच एकदम तें राज्य बखतसिंगानें बळकाविलें व आपल्या नांवाची द्वाही फिरविली.

इ० सन १७६० त राजा बखतसिंग गादीवर बसला. हा मोठा उदार व समयसूचक असून त्याचा आकार भीमासारखा होता. तो मोठा धाडसी, शास्त्रविद्यानिपुण व रसिक होता. आणि जर त्यानें बंधुहत्येचा प्रयत्न केला नसता; तर मारवाडच्या वीरग्रहमालेंत तो केवळ दिनमणी होऊन राहिला असता यांत संशय नाहीं. त्यानें आपल्या सर्व देशबंधूंस उत्तेजन देऊन, परकीय राजास हांकून देण्याविषयीं त्यांना दृढ निश्चयी करून कंबर बांधण्यास तयार केलें. त्याचें राज्य नुसतें ३ वर्षेपर्यंतच होतें, परंतु

इतक्या थोड्या कालांत त्यानें जोधपुरची तटबंदी पूर्ण केली, आणि नाना तऱ्हा करून राज्याचा महसूल वाढविला. त्याला पदभ्रष्ट केलेल्या रामसिंगाचा मुलगा मानसिंग यानें विष घालून मारिलें. परंतु एवढें करूनही मानसिंगास गादी न मिळतां ती दुसऱ्यासच मिळाली.

बखतसिंगानंतर राजा विजयसिंग हा गादीवर बसला, हे रामसिंगास सहन न होऊन तो मोठी फौज जमवून मराठ्यांचे मदतीसह त्याचेवर चालून आला. त्या वेळीं मोठी भयंकर लढाई झाली. तींत विजयसिंगाचा पराभव होऊन तो पळून गेला. या लढाईत एक अनिष्ट गोष्ट झाली ती ही कीं, मारवाडांत मराठ्यांचें पाऊल शिरलें नव्हतें तें या वेळीं पूर्ण शिरलें. मराठ्यांनीं संधी साधून आपलें घोडें पुढें ढकललें. त्यांनीं तेथल्या राज्यकारभारांत हात घातला, आणि रामसिंगास हांकून लावलें. तो इ०सन १७७३ त जयपुरास मृत्यु पावला. त्याच्यामागें विजयसिंग यास नांवाचा मात्र राजा करून बसविलें होतें; परंतु वास्तविक सत्ता मराठ्यांचेच हातांत होती.

विजयसिंगाच्या राज्यांत जिकडे तिकडे सर्व लढाया चालल्या होत्या. त्यानें आपले संस्थानिक व सरदार यांचे हक्क कमी करण्याचा विचार केला होता, यामुळें आपसांतच लढाई सुरू झाली. तींत उलट विजयसिंगाचीच सत्ता कमी झाली, यामुळें त्याच्या पायाची आग मस्तकास जाऊन पोंचली. त्यानें सर्व सरदारांचा सूड उगविण्याचा निश्चय केला. त्यानें आपल्या कुलगुरूच्या दहनविधीसाठीं सर्व

सरदार व संस्थानिक वगैरे लोकांस बोलाविलें आणि तेथें त्यांवर मारेकरी घालून गृहकलहाचा शेवट केला.

त्या सरदारांपैकीं एका सरदाराच्या मुलानें बंड केलें, परंतु त्यांत त्याचा पराभव झाला. आपले सर्व सरदार वगैरे खुद्द मंडळीच्या मनांतून तें शल्य जावें ह्मणून त्यानें त्यांचीं चित्तें स्वस्थ करण्यासाठीं त्यांस एके लढाईस पाठविलें. त्यांनीं त्या वेळीं अमरकोट जिंकलें व जेसलमीर हस्तगत केलें. नंतर माघारे परतून त्यांनीं मेवाडापासून पुन: बराच मुलुख आपले ताब्यांत घेतला. असे विजय करीत करीत विजयसिंगानें जयपुरचा राजा प्रतापसिंग याशीं, मराठ्यांस आपले प्रदेशांतून हांकून लावण्यासाठीं, ऐक्य केलें. पुढें कांहीं दिवसांनीं या दोन्हीं सैन्यांची टोंक येथें गांठ पडली. त्यांत मराठ्यांस शिवाजीच्या घोडेस्वारांची मदत असतांही ते पराभव पावले. हा जय झाल्याकारणानें राजानें आपले ताब्यांत अजमीर शहर घेतलें.

इ० सन १७९१ च्या सुमारास पाटणा येथें डीबोन यानें सप्तेंबरच्या १२ व्या तारखेस रजपुतांचा पराभव केला. अजमीर रजपुतांचे ताब्यांतून निघून गेलें. रजपूत लोकांस ६ लाख रुपये खंडणी द्यावी लागली. कांहीं दिवसांनीं विजयसिंग हा एका वेश्येच्या नादानें फारच बिघडून गेला होता. पुढें तिच्या सांगण्यावरून त्यानें फार साहसाचीं कामें केलीं. अखेर तो इ० सन १७९३ त मृत्यु पावला. त्याचे मुलगे चांगले पराक्रमी असे होते तेः—१ झलिमसिंग, २ सवंतसिंग, ३ शिरसिंग,

४ भीमसिंग, ५ गोविंदसिंग, आणि ६ सरदारसिंग. पैकीं झलीमसिंग मात्र खरा वारस होता.

विजयसिंगानें आपले वेश्येस संतुष्ट करण्याकरितां शिरसिंगाचा मुलगा मानसिंग यास दत्तक घेतलें होतें. परंतु विजयसिंगामागें त्याचा चौथा मुलगा भीमसिंग यानें गादी बळकावली. त्यानें कपटानें राज्यपदाचे हेतूनें झलीमसिंगाचा पराभव केला. बाकीच्या चार भावांस त्यांच्या संततीसह विषप्रयोग करून त्या दुष्टानें हाल हाल करून त्यांस यमलोकास पाठविलें. त्यांत मानसिंग हा मोठ्या युक्तीनें झेलोर येथें दडून राहिला होता. तेथें भीमसिंग त्यास धरण्यास गेला तेव्हां त्यानें हल्ला केला. हल्यानें तें शहर स्वाधीन होत नाहींसें पाहून मोठा दुर्धर वेढा घातला. हा वेढा सुरू असतां त्यानें आपले सरदारांस इतकें त्रासविलें कीं, शेवटीं ते सर्व लोक त्याला सोडून गेले. इतकें झालें तरी वेढा उठविला नाहीं. आंतील लोक अन्नावांचून उपास काढण्याच्या बेतांत आले होते, परंतु एकाएकीं इ० सन १८०३त भीमसिंग मृत्यु पावला.

मानसिंग हा इ० सन १८०३ त गादीवर बसला. एकदम राजसत्ता हातीं आल्यामुळें तो फारच उन्मत्त झाला होता. हा गादीवर बसला तेव्हां नुकतेंच इंग्रज सरकार शिंद्यास जिंकून होळकराचे पाठीस लागलें होतें. राजपुताण्यांत आपला पूर्ण अंमल सुरू व्हावा या मतलबानें इंग्रजांनीं मानसिंगास मदत नको असतांही देऊं केली, व पुढें उभयतांनुमतें एक तह झाला. परंतु त्या तहाप्रमाणें राजाची वागणूक झाली नाहीं. इंग्रजांचा शत्रु जो

यशवंत राव होळकर त्यास राजानें मदत केली हें पाहून इंग्रज सरकारानें आपला तह मोडला; आणि राजपुतानाप्रकरणांतून अगदीं हे अलग राहिले. ही अंतस्थ बातमी अमीरखानास समजल्यामुळें पुढें मानसिंगाच्या राज्यांत अमीरखानास लुटालुट करण्यास पुष्कळ सवड सांपडली. इकडे भीमसिंग मृत्यु पावला तेव्हां त्याची राणी गर्भिणी होती तीस पुढें मुलगा झाला. त्याचें नांव धोकलसिंग असें ठेविलें. पुष्कळ सरदार लोक त्याच्या पक्षाचे झाले. या मुलाला पुष्कळ संस्थानिकांच्याद्वारें त्याच्या निरनिराळ्या अनेक सरदारांस हा तुमचा यजमान असें दाखविलें. कदाचित् कोणी या मुलाचा घात करील या शंकेनें त्या मुलाला शेखेवतीचे संस्थानिकांनीं रक्षण करावें या हेतूनें त्यास तिकडे पाठविलें. मानसिंगाचे राज्यांत एकसारख्या पुष्कळ लढाया झाल्या, त्यांस केवळ त्यांचा मूर्खपणाच कारण होय.

उदेपुरच्या राण्याचे मुलीशीं विवाह करण्याच्या हेतूनें जयपुरच्या राजाशीं त्यानें मोठमोठ्या लढाया केल्या. त्या लढायांत अमीरखानाचे लुटारू लोकांनीं मारवाड व मेवाड आणि जयपुरचे प्रांत लुटून फस्त करून टाकिले. त्या वेळेस त्यांनीं फारच अघोर अशीं कामें केलीं आहेत. त्यांचें वर्णन ऐकतांच आंगावर शहारे येतात.

धोकलसिंग हा लढाई करण्याकरितां तयार झाला परंतु त्यांस त्याचे अनुनायी लोक अनुकूल नव्हते हें पाहून राजास फार काळजी पडली; यांतून पार पडण्यासाठीं त्यानें वेड्याचें सोंग घेऊन आपला मुलगा चतरसिं-

ग यास गादीचा मालक केलें. या राजाचे कारकीर्दीत इंग्रज सरकारानें अमीरखानास कांहीं शर्ती कबूल करण्यास सांगितल्या, त्या त्यानें मान्य केल्या. त्या योगानें राजपुताना अमीरखानाच्या लुटालुटीपासून मुक्त झाला.

जोधपूर आणि इंग्रजसरकार यांच्यामध्यें पुढें तह झाला. त्या तहाच्या योगानें अडचणीच्या वेळीं इंग्रज सरकारानें संस्थानचें संरक्षण करण्याचें कबूल केलें; व इंग्रज सरकारच्या श्रेष्ठत्वामुळें त्यांस अनुकूल असे दुसरे कांहीं ठराव करण्यांत आले. परंतु त्याच समयीं चतरसिंग मृत्यु पावला. आपला मुलगा मृत्यु पावून थोडे दिवस झाले नाहींत तोंच राजा मानसिंग यानें लबाडीनें घेतलेलें वेड्याचें पांघरूण टाकून देऊन तो स्वतः राज्यकारभार करूं लागला. जिकडे तिकडे निष्कंटक झालेंसें वाटल्यामुळें राजाची मनोवृत्ति दिवसेंदिवस शिथिल होत चालली. या राजानें वेड्याचें सोंग घेतलें होतें तेव्हां त्याच्या सरदारांनीं त्याची अवहेलना केली होती, त्या सर्वांस त्यानें बहुशा कैद केलें, व कित्येकांस ठार मारून त्यांची सुमारें दहाकोट रुपयांची मालमत्ता जप्त केली. राज्यांत कोठें न्यायाचें नांव ऐकूं येईनासें झालें. चहूंकडे बंडाचीं व लुटीचीं कामें सुरू झालीं.

जोधपूर येथें विश्वासघात, निर्दयपणा व क्रौर्य हीं जिकडे तिकडे पसरलीं. अपराध फारच झाल्यामुळें राज्यांतील रयत त्रासून गेली. तरी एकाएकीं तिच्यानें राजाविरुद्ध बोलवेना. पुढें फारच त्रास होऊं लागल्यामुळें सरदार व संस्थानिक यांनीं इंग्रज सरकारांकडे आपल्या राजाच्या अन्यायांबद्दल फिर्याद केली. ब्रिटिश सरकारचे

अधिकाऱ्यांनीं राजास सामोपचाराच्या पुष्कळ गोष्टी सांगून तुम्हीं आपले तंटे आपसांत मिटवून टाकावे ह्मणून सुचविलें. परंतु कांहीं केल्यानें राजा शुद्धीवर येईना. इ०सन.१८२७ त सर्व सरदारांनीं आपले अनुयायी लोकांस एकत्र करून पूर्वींचा राजा भीमसिंग याचा मुलगा धोकलसिंग यांस मुख्य करून जोधपुरावर स्वारी करण्याचा बेत केला. तेव्हां आपल्या उभयतांच्या तहाप्रमाणें माझ्या राज्याची चांगली व्यवस्था लावून द्यावी असें राजा मानसिंग यानें मोठ्या नम्रतेनें ब्रिटिश सरकारास सांगितलें. परंतु ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं राजा मानसिंग यास सांगितलें कीं, * आह्मीं तुह्मांस राज्यरीति सुधारण्याबद्दल वेळोवेळीं सांगत होतों, परंतु तुम्ही ती गोष्ट मान्य न करतां बेफामपणानें वागल्यामुळें तुह्मांस योग्य फळ परमेश्वरानें

* ज्या राजाची प्रजा त्याच्या जुलुमानें त्रासून आपल्या राजावर प्रीति करीत नाहीं त्या राजाच्या पक्षानें जोधपुरावर आह्मांस सैन्य नेतां येणार नाहीं, तुमचे राज्यांत जें बंड झालें आहे त्यांत सर्वांचें ऐक्य झाल्यामुळें त्याचा पराभव होणें आह्मांस अशक्य होय.ज्या राजाच्या संरक्षणाची हमी आह्मीं शिरावर घेतली आहे त्या राजांनीं पाहिजे तेव्हां मदत मागितली असतां त्यांस आह्मीं मदत देतों; परंतु जर ते राजे स्वतः महा मूर्ख व जुलमी होऊन नेहमी अन्याय करूं लागले आणि त्यामुळें सर्व राज्यांतील लोक त्यास त्रासून त्यांनीं बंड केलें, तर मात्र त्या राजाचा पक्ष आह्मी घेऊन लढणार नाहीं. राजे लोकांनीं आपले प्रजेचें संरक्षण करावें तें न करतां जर ते प्रजेस नागवून त्रासवितील तर त्यांपासून जो दंगा होईल व जे वाईट परिणाम घडतील त्यांचें फळ राजानें भोगावें हें योग्य आहे, असें ब्रिटिशसरकारानें साफ सांगितलें.

देलें हें फार चांगलें झालें. असें इंग्रज सरकाराकडून उत्तर मिळतांच राजा मानसिंग याचें धैर्य खचून तो वेडा झाला. या वेळेस जोधपुरास जी लढाई होणार होती ती राजा मानसिंग याच्या अन्यायामुळेंच होती.

मानसिंगाचें जुलमी व क्रूर वर्तन दिवसेंदिवस कमी न होतां त्याची वृत्ति फारच चमत्कारिक झाल्यामुळें इंग्रज सरकारास लोकांचे हितासाठीं मध्यें पडणें भाग पडलें. इ० सन १८३९ त इंग्रजांची एक पलटण जोधपुरावर आली. त्यांचा उद्देश तेथील दंगाधोपा बंद करून तें राज्य शांततेनें सुरळीत चालावें असा होता. जोधपुरास सैन्य ५ महिने होतें त्या भीतीनें राजा मानसिंगानें ठराव केले. त्या ठरावांत पूर्वीच्या वहिवाटीप्रमाणें सरदारांच्या हक्कांचें संरक्षण व मानमरातब राखण्याविषयीं त्यानें आपणांस बांधून घेतलें. रयतेस योग्यरीतीनें न्याय मिळावा ह्मणून जोधपुरास एक कौन्सिल नेमिलें, व त्यांत "ब्रिटिशपोलिटिकल एजंट" मुख्य असावा हेंही राजानें कबूल केलें.

राजा मानसिंग याच्याजवळ दोन वाईट मनुष्य होते ते काढून लाविले व जप्त केलेल्या जमिनी ज्यांच्या त्यांस दिल्या. खंडणी व सैन्याच्या खर्चाबद्दल जी बाकी राहिली होती ती देऊन टाकण्यासाठीं उत्तम अशी व्यवस्था केली. ज्या ज्या लोकांनीं बंड करून राज्यांत दंगे माजविले होते त्यांस धरून योग्य शासन केलें; यामुळें राज्यांत पुढें शांतता झाली. ही व्यवस्था झाल्यानंतर ४ वर्षांनीं राजा मानसिंग मृत्यु पावला. त्याला मूलबाळ नव्हतें.

भीमसिंगाचा मुलगा धोकलसिंग हा या वेळेस आपली गादी मिळविण्याच्या खटपटींत होता, परंतु त्याची ती खटपट कोणीही कबूल करीना. नवा राजा पसंत करण्याचें काम राण्या, सरदार, मानकरी व मोठमोठे अधिकारी यांजवर सोंपविलें होतें. त्यांनीं बखतसिंग यास पसंत केलें.

इ० सन १८४३ त बखतसिंग यास गादीवर बसविलें. हा मोठा शहाणा व हुशार होईल असें सर्वांस वाटलें होतें; पण तें फारसें अनुभवास आलें नाहीं. हा गादीवर बसल्यानंतर थोडक्याच दिवसांत पुन: पूर्वींपेक्षां अधिक अशी अव्यवस्था झाली, यामुळें राज्यांत चहूंकडे दंगे सुरू झाले. हा मोठा लोभी व राज्यकारभाराकडे दुर्लक्ष करणारा होता. तेव्हां अर्थात् सर्व राज्यव्यवस्था अंमलदारांच्याच हातांत आली व ते "यथा राजा तथा प्रजा" याप्रमाणें वागूं लागले. राज्यांत बंडाळी व अव्यवस्था इतकी झाली कीं, इ. सन १८६७ त सर्व सरदार व संस्थानिक बंड करण्याच्या बेतांत होते. पण इंग्रजाच्या भीतीनें तें बंड झालें नाहीं.

गणपतसिंग या नांवाचा एक संस्थानिक होता, तो मृत्यु पावला. तेव्हां त्याची जहागीर व इतर उत्पन्न वगैरे त्याच्या सख्या भावास मिळावें, परंतु तसें न करितां राजानें द्रव्यलोभास्तव सैन्य पाठवून गणपतसिंगाच्या सर्व उत्पन्नाचा अपहार करून, तें आपल्या एका मुलास द्यावें असा त्याचा विचार होता. "अगोदरच उल्हास आणि त्यांत फाल्गुनमास" या म्हणीप्रमाणें झालें. सरदार व मानकरी यांनीं ब्रिटिश सरकारास राजानें केलेले सर्व अन्याय दाखवून दिले. हें ब्रिटिश सरकारास समजतांच त्यांनीं

राजास योग्य ते शासन केलें, तेव्हां राजा शुद्धीवरव पुन्हां मी असें करणार नाहीं ह्मणून जेव्हां सांगितलें तेव्हां सर्व व्यवस्था सुरळीत चालली.

इ० सन १८७१ त गव्हर्नर जनरल लार्ड मेयो हे राजपुतान्यांत कांहीं कामाकरितां आले होते, तेव्हां अजमीरास दरबार भरला. तेव्हां त्या दरबारास उदेपुरचे व जोधपूरचे राणे बोलाविले होते. ज्या ज्या वेळेस दरबार भरेल तेव्हां उदेपुरचे राजानें जोधपुरच्या खालीं बसावें अशी पूर्वीपासून चाल आहे. त्याप्रमाणें पुष्कळ वेळां ठरलें असतांना जोधपुरच्या राजानें मी उदेपुरच्या राण्याचे खालीं बसणार नाहीं ह्मणून सांगून पाठविलें. असें न करण्याबद्दल पोलिटिकल एजंटांनीं पुष्कळ प्रकारें सांगितलें, परंतु त्यानीं कांहींएक न ऐकतां साफ सांगितलें कीं, मी उदेपुरच्या खालीं बसणार नाहीं. तेव्हां "व्हाइसरायानीं" त्यांची एक तास वाट पाहून दरबार भरविला, त्यांत जोधपूरकरांची खुर्ची रिकामी होती, इतका त्यांचा मान आहे. हल्लींही इंग्रज सरकारचे अधिकारी त्यांचेबरोबर फार आदबीनें वागतात.

इ० सन १८५७ त जें मोठें प्रचंड बंड झालें होतें, त्या वेळीं त्यांनीं इंग्रज सरकारास पुष्कळ प्रकारची चांगली मदत केल्यामुळें त्या वेळीं त्यांची मोठी वाहवा केली आहे. यांस दत्तकाचा अधिकार असून सर्व प्रकारचा बहुमान मिळतो. हल्लीं राज्यव्यवस्था बरी आहे. रयतेस योग्य प्रकारचा न्याय मिळतो. प्रजा सुखी आहे.

प्रकरण तिसरें समाप्त.

## प्रकरण चौथें.

# भरतपूर.

याचे उत्तरेस ब्रिटिश सरकारची हद्द, ईशान्येस मथुरा, पूर्वेस आग्रा, दक्षिणेस केवद, केरवली आणि जयपूर, पश्चिमेस अलवार.

हिंदुस्थानापैकीं बड्या संस्थानांतील फार महत्वाचें संस्थान केवळ हेंच होय. ह्या संस्थानांत सर्व संस्थानांपेक्षां एक अपूर्व चमत्कार असा आहे कीं, यांतील राजे, सरदार आणि बहुतेक रयत हे एका जातीचे आहेत. या लोकांस प्राचीन ग्रंथकार जिटी आणि मासाजिटी असें ह्मणतात.

हे जाट लोक मुलतानांतून १७ व्या शतकांत बाहेर पडून दुवाबामधील प्रदेशांत वसाहत करून राहिले व तेथें शेतकीवर निर्वाह करूं लागले. जाट लोकांनीं इ. सन १०२६ त गिजनीचा महंमद सोमनाथाहून मुलतानास जात असतां त्यास अतिशय त्रास दिला, यामुळें त्यानें जाट लोकांचा पराभव करून जाट लोकांचें पुष्कळ तऱ्हेचें नुकसान केलें.

या जाट लोकांनीं इ. सन १५२५ त बाबर हा पंजाबांतून येत असतां त्याला फार त्रास दिला. या लोकांच्या त्रासामुळें बाबरचे लोक पुष्कळदां पळूनही गेले. यांच्या नैसर्गिक उद्धट वर्तनामुळें पुष्कळ वेळां बादशहाचा त्यांजवर कोप होऊन त्याबद्दल त्यांना शासनही चांगलें मिळालें. परंतु पुढें बादशहाचा व त्यांचा कलह चालला असतां बादशहा मरण पावल्यानंतर त्या

शूर आणि साहसी लोकांस आपआपल्या गुणांचा पुष्कळ तऱ्हेनें उपयोग करून घेण्यास संधि सांपडली. या वेळीं राजघराण्यामध्यें आपआपसांत क्षुल्लक कारणानें तंटे लागले होते. हा समय पाहून त्यांनीं चुरानम यास आपला स्वामी केलें. आणि स्वतः ते ज्या जमिनी नांगरीत असत, त्या जमिनींवर निरनिराळ्या खेड्यांपाड्यांत त्यांनीं किल्ले बांधिले. अशा रीतीनें दंगेधोपे करून त्यांनीं आपणास शूर हें नांव संपादन करून घेतलें; आणि संपादलेल्या नांवाप्रमाणें बादशहा फिरूकशीर याच्या वसाहतीच्या प्रदेशापर्यंत, त्यांनीं आपल्या स्वाऱ्या सुरू केल्या.

बादशहाची सत्ता त्या वेळीं सय्यदांचे हातीं होती. जरी या वेळीं जाट लोकांच्या सत्तावृक्षास नुकताच अंकूर फुटत चालला होता; तरी त्यांनीं अशा बाल्यावस्थेंत असतांही आपल्या मातीच्या भिंतींचें रक्षण फारच शूरपणानें व बुद्धिमत्तेनें केलें. ह्या त्यांच्या कृत्यावरूनच ते पुढें फार प्रसिद्ध झाले. त्यांनीं आपल्या प्रतिपक्ष्यांना खूप जेरीस आणलें. व चुरानम त्याचा बंधु बदनसिंग या उभयतांचें कांहीं कारणावरून वांकडें पडलें होतें, यामुळें चुरानम यानें आपल्या भावास*एकदम कैद करून त्याचे फार हाल केले व यांतच त्यानें मरावें असें त्याच्या मनांत वागत असे. असें न करण्याबद्दल चुरानम यास त्याच्या आईनें व त्याच्या आप्तांनीं पुष्कळ सांगितलें. परंतु त्यांचें न ऐकतां आपल्या

* प्रचारांत ह्मण आहे ती कांहीं खोटी नाहीं. ' 'सख्खे भाऊ आणि पक्के वैरी." याप्रमाणें त्यानें हें काम राजरोस केलें. एका कुटुंबांतील व एका आईचीं लेंकरें, पण त्यांचासुद्धां राग असें घोरकर्म करण्यापर्यंत यावा ना !

भावाचे दिवसेंदिवस हाल ज्यास्त करूं लागला. यानंतर थोड्याच वेळानें चुरानम याचा बंधु बदनसिंग हा आपल्या भावाच्या कैदेंतून सुटून राजा जयसिंग याची मदत मागूं लागलां; आणि पुनःलढाई करण्यासाठीं त्यानें त्याचें मन वळविलें. या वेळीं जाट लोकांची आपआपसांत मोठी भयंकर लढाई झाली. प्रतिपक्षाचा जय झाला. चुरानम आणि त्याचा मुलगा हे पळून गेले, व जयसिंगानें राणा बदनसिंग यास संस्थानाचा मालक करून राजा केलें. हा पुढें मोठा पराक्रमी झाला, व यानें पुष्कळ महत्वाचीं कामें केलीं. याची कारकीर्द प्रजेला फार आवडली.

वजीर गाजीउद्दीन, मराठे आणि जयपुरचे महाराज या तिघांच्याही एकत्र झालेल्या सैन्यास जाट लोकांनीं यत्किंचितही दाद न देतां त्यांचे सर्व प्रयत्न निष्फळ केले. परंतु शेवटीं त्यांना ७,००,००० रुपये देऊन त्यांच्यात मिळावें हें त्यास बरें वाटलें. पुढें ६ वर्षांनीं तीस हजार लोकांनिशीं तो मराठे लोकांस मिळाला. या वेळेस मराठ्यांच्या सैन्याचें आधिपत्य सदाशिवरावभाऊकडे असून भरतखंडाचें पूर्ण स्वामित्व मिळण्यासाठीं ते दिल्लीवर स्वारी करीत होते. त्या वेळेस मराठे लोकांचा नायक हा फार गर्विष्ठ व हट्टी असल्या कारणानें तो त्या कामास नालायक होता. ह्मणून सुराजमल यानें आपलें आंग काढून घेतलें. व यामुळेंच पानिपतच्या सपाट्यांतून तो बचला.

या लढाईंत मराठ्यांचा फार नाश झाला. ही संधि साधून सुराजमलानें आपणास पाहिजे तो कार्यभाग करून घेतला. व लागलाच त्यानें आग्र्याचा किल्ला आपले ताब्यांत घेतला,

आणि तेथें सैन्य ठेविलें. पुढें ३ वर्षांनीं त्यानें दिल्लीवर स्वारी करण्याचासुद्धां बेत केला होता. या वेळेस त्याचा तळ अगदीं शत्रूच्या सैन्याजवळ होता. कोणे एके वेळेस तो शिकारीस चालला असतां बलूची घोडेस्वारांच्या टोळीनें त्यावर हल्ला करून त्यास ठार मारिलें. त्यानें पुष्कळ लढाया करून मुलूख काबीज करून आपल्या राज्यास जोडला.

याच्यामागून त्याचा मुलगा जवानसिंग हा गादीवर बसल्याबरोबर यानें बापासारखे पराक्रम करून बराच मुलूख सर केला व पुढें जयपुरावर हल्ला केला; त्यांत त्याचा पराभव होऊन मारेकऱ्यांकडून तो कपटानें मारला गेला. त्याच्या मागून त्याचा भाऊ रतनसिंग हा गादीवर बसला. याच्या कारकीर्दीत एक गोसावी आला व आपण किमया करून सोनें करतों असें सांगून त्यानें जाट लोकांपासून पुष्कळ द्रव्य हरण केलें. ही बातमी राजा रतनसिंग यास समजतांच त्यानें त्या गोसाव्यास राजवाड्यांत आणून सांगितलें कीं, तूं तांब्याचें जर सोनें करशील तर तुला एक लाख रुपये बक्षीस देऊं, व तसें न झाल्यास तुला हत्तीचे पायास बांधून हाल हाल करून मारूं. असें सांगतांच तो फार घाबरला व संधी साधून तो राजाचा खून करून पळून गेला. या कृतघ्न * नराधमाचा पुष्कळ शोध केला, परंतु त्याचा कोठेंच पत्ता लागला नाहीं.

---

*लबाड लोक हे प्राण वांचविण्याकरितां काय करतील आणि काय नाहीं याचा कांहीं नेम नाहीं. किमयानें सोनें करतों असें सांगून पुष्कळ लोक हल्लींसुद्धां नागवितात. या गोसाव्याचे

याच्यामागून याचा मुलगा केसरीसिंग हा लहान होता, तो गादीवर बसला.त्या वेळीं नेवालसिंग हा त्याचा संरक्षक झाला. त्याजवर मोठमोठीं संकटें आलीं होतीं त्यामुळें तो त्रासून गेला होता. तो लढण्याच्या कामीं इतका कुशल होता कीं, कसलाही शत्रु असला तरी युक्तीनें त्यास जेरीस आणी, पण अंतस्थ काळजीमुळें त्याला शत्रूंशीं समरांगणांत सामना करण्याची मुळींच शक्ति राहिली नव्हती ह्मणून त्याला दीग किल्यांत जाऊन स्वस्थ राहावें लागलें. तेथें तो इ० सन १७७३ त उदराच्या रोगानें मृत्यु पावला.

सुराजमल याचा तिसरा मुलगा नमालसिंग हा आपले भावाचे जहागिरींत राज्यकारभाराचें व राजपुत्रपालकाचें काम करूं लागला. परंतु त्याचा धाकटा भाऊ रणजित सिंग यास राज्यकारभार चालविण्याची महत्वाकांक्षा उत्पन्न झाल्यावरून त्यानें दिल्लींतील राजसत्ताप्रमुख मिर्झाजा फरखान याचा आश्रय करून त्यास आपले साह्यास बोलाविलें. मिर्झा यानें तें कबूल करून आग्र्याचा किल्ला हस्तगत केला. इकडे नमालसिंग हा रोहिलखंडांत शत्रुबरोबर लढण्यांस जात असतां प्रथम त्यानें दिल्लीवर स्वारी करून शिकंदराबादेवर हल्ला केला, आणि त्यास घेरलें. तेथें

---

हे लबाड कृत्य उघडकीस आलें असते तर राजानें त्याचें हालहाल करून प्राण घेतला असता; परंतु या कृतघ्नाच्या पापाचा घडा पुर्ण न भरल्यामुळें तो राजाचा खून करून पळून गेला.तथापि त्याला पापाचें फळ मिळाल्याशिवाय राहणार नाहीं,हें उघडच आहे.

त्यानें यवनांस मार्गे हटविलें. सामरू यानें एक उत्तम फौज तयार केली होती ती मदतीस घेऊन तो होदळास जाऊन पोंचला. हें दिल्लीपासून ६० मैल लांब आहे. तेथें या वेळेस मिर्झा जाफरखान यानें त्यावर हल्ला करून त्यास हांकून लाविलें. या वेळेस मिर्झा त्याच कारणाकरितां रणजितसिंगास घेऊन आला होता. नंतर नमालसिंग आणि सामरू हे प्रथम कोतबा व नंतर दीग या किल्यांवर माघारे उलटले. तेथें मिर्झानें त्यांचा पाठलाग केला. मिर्झा यास दीग घेण्यास फार कठीण वाटल्यावरून त्यानें जाट लोकांस फसवून बरसाना येथें आणिलें आणि तेथें त्यावर कपटानें हल्ला करून त्यांचा पराभव केला.

दीग ह्यास वेढा बसण्यापूर्वी बारा महिनेपर्यंत त्यांनीं शत्रूसमोर रणांगणांत उभे राहून आपलें रक्षण केलें. यामुळें रणजित्‌सिंगास भरतपूर स्वाधीन करून घेण्याचें सामर्थ्य आलें. त्या वेळीं त्याच्या पूर्वजांच्या ताब्यांत फक्त हाच प्रदेश होता. असें असतां मिर्झा जाफरखान यानें रणजित्‌सिंग याच्या आईच्या मध्यस्थीवरून त्याच्या घराण्याकडे १ लक्ष रुपयांची नेमणूक करून दिली.

इ० सन १७८२ त मिर्झा मृत्यु पावल्यानंतर जो घोटाळा झाला त्यांत भरतपुरसुद्धां जाट लोकांचा सर्व मुलुख शिंद्याच्या हातांत गेला, परंतु सुराज मलच्या बायकोनें मध्यस्थी केल्यावरून त्यानें रणजित् सिंगाला १० लक्ष रुपयांचे ११ परगणे दिले. यानंतर जनरल पेरोन यास मदत केल्याबद्दल पुनः ४ लक्ष रुपयांचा मुलूख जास्ती मिळाला, इतक्यांत याच्यापेक्षां जवळचा गा-

दीचा मालक मृत्यु पावल्या कारणानें रणजितसिंग पुढें भरतपुरचा राजा झाला.

रणजितसिंगाच्या पूर्वीच्या आचरणापासून देशास कांहीं एक फायदा झाला नाहीं. परंतु गादीवर बसल्यानंतरच्या कारकीर्दींत त्यानें अशीं कांहीं साहसाचीं कृत्यें केलीं कीं, त्याच्यासारखें यश कोणासही मिळालें नाहीं. या कृत्यांनीं त्याचें आणि त्याच्या राजधानीचें नांव सर्वतोमुखीं झालें आहे.

ब्रिटिश सरकाराशीं दोस्तीनें राहून आपला फायदा करून घ्यावा अशी इच्छा बाळगणारीं त्या वेळीं हिंदुस्थानांत बरींच संस्थानें होतीं. त्यांपैकीं रणजितसिंग याचें संस्थान प्रमुख होय. त्याचें संस्थान लहान होतें. मराठ्याशीं लढाई सुरू होण्याचे आरंभास याचा व ब्रिटिश सरकारचा एक तह झाला होता. त्यांत संस्थानच्या रयतेचें रक्षण करून मराठ्यांचे खंडणींतून त्यास सोडविलें व कोणी परकीयराजानें तुमच्या राज्यांत जर कांहीं कामीज्यास्त केलें तर आह्मीं तसें कोणासही करूं देणार नाहीं असें आश्वासन देऊन इंग्रज सरकारानें त्यास अभिवचन* दिलें.

या अंमलदारांच्या सांगणीनें आपण फसलों असें त्यास

* कदाचित् इंग्रजांनीं मल्हाररावी केली तर त्यास काय करावें, हें त्याला वेळेवर न सुचल्यामुळें ब्रिटिश सरकारच्या अमलदारांनीं जे नियम केले त्यांस वंद्य मानून राहिल्यामुळें, पुढें त्यास पुष्कळ प्रकारचीं संकटें भोगावीं लागलीं.

पुढें वाटूं लागलें व त्या वेळेपासून तो फार सावधगिरीनें वागूं लागला. "तसेंच संस्थानचें स्वातंत्र्यही* कबूल केलें"

इ० सन १८०३त इंग्रज सरकारानें दौलतराव शिंद्या-वर ज्या वेळीं स्वारी केली त्या वेळेस लार्डलेक यास भरतपु-रचे कांटिजन्सीचे घोडेस्वाराची चांगली मदत मिळाल्या-मुळें त्यास फार उपयोग झाला. त्या स्वारांनीं या मो-हिमेचा शेवट होईपर्यंत ब्रिटिश सरकारची कामगिरी उत्तम रीतीनें बजावली. या कामगिरीबद्दल ब्रिटिश सर-कारानें भरतपुरचे राजास ७ लक्ष रुपयांचा चांगला मुलूख बक्षीस दिला. इ० सन १८०३ च्या डिसेंबर महिन्यांत "ब्रिटिश सरकारचा कमांडर इनचीफ लार्ड-लेक" याची आणि रणजितसिंगाची कनोर येथें लास-वारीहून परत येत असतां गांठ पडली व या त्याच्या गांठींतील बोलण्यावरून राजाचे पुष्कळ मनोरथ पूर्ण झाले.

ब्रिटिश सरकार आणि राजा यांमध्यें जें बोलणें झालें त्यांत राजानें ज्या कामगिऱ्या बजाविल्या त्यांबद्दल त्यास जें नुकसान झालें होतें तें सर्व भरून दिलें, यामुळें कोणत्याही रीतीनें त्याचा असंतोष झाला नाहीं. पुढें कांहीं कारणानें ब्रिटिश सरकाच्या लोभी वर्तनास राजा कंटाळून मोठ्या कष्टानें त्यानें होळकराशीं गुप्त पत्रव्यवहार सुरू केला. त्या पत्रांत होळकरास राजानें असें लिहिलें होतें

* राजानें जर्मनीप्रमाणें प्रत्येक मनुष्यानें ५ वर्षें लष्करांत नोकरी केलीच पाहिजे असा आपले राज्यांत कायदा केला; व फ्रान्सा सारखें सव राष्ट्र लढाऊ करण्याचें मनांत आणलें तर त्यास करतां येईल काय? जर नाहीं तर स्वातंत्र्य कसलें.

कीं, इंग्रजसरकाराशीं लढाई करा. या कामीं मी आपणांस चांगली मदत करीन. पुढें होळकराची व ब्रिटिश सरकारची लढाई चालली असतां होळकरास भरतपुरच्या कंटिजन्सीनें चांगली मदत करून इंग्लिश लोकांशीं दीग येथें लढाई केली. होळकराच्या सैन्यानें ब्रिटिशांच्या फौजेची दाणादाण केल्यामुळें त्यांची फौज किल्याखालून पळत सुटली, तेव्हां राजाच्या घोडेस्वारांनीं त्यांचा फार नाश केला. या त्याच्या कृत्यावरून भरतपुरचा राजा आपला पूर्ण शत्रु आहे अशी ब्रिटिश सरकारची पूर्ण खातरी झाली.

पुढें इंग्रज सरकारानें त्याशीं शत्रुत्व धरून दीग किल्ला आपले स्वाधीन करून घेतला आणि भरतपुरास वेढा घातला. या वेळीं भरतपुरचा किल्ला गेला तर आपले जिविताचा सर्वस्वी नाश आहे असें समजून हरएक प्रकारें त्याचें रक्षण करण्याविषयीं त्यानें निश्चय केला. हा हेतु पूर्ण करण्यास त्याला त्याच्या सैन्यानें आणि लोकांनीं चांगली मदत केली. या महापराक्रमी वीरानें इंग्रज लोकांस ४ वेळां मोठ्या शौर्यानें आणि निकरानें लढून मागें हटविलें. या लढाईंत इंग्रज लोकांचे मेलेले आणि जखमी झालेले मिळून एकंदर ३,२०३ लोकांचा त्यानें नाश केला.

ब्रिटिश लोकांचा याप्रमाणें जरी रणजितसिंगानें चार वेळां पराभव केला तरी या युद्धांत शेवटीं जयच होईल अशी त्यास खातरी नव्हती. पुढें होळकरानें त्यास सोडिलें व लढाईचा अवाढव्य खर्च वाढत चालला. त्याचप्रमाणें इंग्लिश सैन्याच्या नायकाचा दृढ निश्चय पाहून

राजा अगदीं घाबरून गेला आणि जनरल लार्ड लेक यास सांगून पाठविलें कीं, मी तह करण्यास कबूल आहें. नंतर तह करून त्या तहाअन्वयें रणजितसिंगानें २० लक्ष रुपये देण्याचें कबूल केलें, व ७ लक्ष रुपये लागलेच रोख दिले. ब्रिटिश लोकांनीं पूर्वी रणजितसिंगाचे जे प्रांत घेतले होते ते प्रांत राजास परत न देतां आपल्याकडेच ठेविले. यामुळें भरतपुरच्या उत्पन्नांत पुष्कळ तूट येऊं लागली.

इ० सन १८२३ त ब्रिटिशांनीं राजास कांहीं मुलुख दिला होता तो पुन्हा माघारा घेतल्यामुळें राजास ब्रिटिश सरकारचा कपटी स्वभाव कळून आला. नंतर राजानें व त्याच्या प्रजेनें ब्रिटिशांबरोबर शत्रुत्व* धरून त्यांचें फार नुकसान केलें.

भरतपुरच्या किल्यापासून राजानें इंग्रज लोकांस हांकून लावल्यामुळें हिंदुस्थानांतील सर्व राजे भरतपुरच्या राजास दचकत असत. इंग्रज लोकांस भरतपुरचें नांव काढिलें कीं, चरका लागून त्यांस सर्पदंशाप्रमाणें

* यांत भरतपुरच्या राजास कीर्ति, भूषण आणि नांव मिळालें. इंग्रज लोक हे संस्थानांत शिरून आपलें काम कसें करून घेतात व मग ते आंग झाडून कसे मोकळे होतात हें त्यांचें करणें रणजितसिंगास सहन न होऊन त्यानें असा निश्चय केला कीं, झालेला तह मोडून या लोकांस आपल्या हद्दीच्याबाहेर घालविलें पाहिजे. असा विचार करून त्यानें आपलें संस्थानिक व मानकरी वगैरे लोकांस विचारून त्यांच्या अनुमतानें इंग्रज लोकांस किल्याच्या तटापासून त्यानें मोठ्या युक्तीनें हांकून देऊन त्यांचें सैन्यास सैरावैरा पळण्यांस लाविलें. सर्व भरतखंडांत केवळ भरतपुरचाच लढाऊ असा किल्ला होय.

सर्वांगास वेदना होत. त्या वेदनांचें समूळोन्मूलन पुनः इंग्रज लोकांनीं किल्ला घेतला तेव्हां झालें. इतकें कृत्य होण्यास २० वर्षें लागलीं. याच्यासारखा कीर्तिवान् राजा पुष्कळ दिवसांत भरतपुरच्या गादीवर बसला नव्हता.

ब्रिटिशांनीं आपला पुनः अपमान केला त्याचें या लोकांस चांगलें प्रायःश्चित्त दिलें पाहिजे असा विचार करून राजानें आपल्या लोकांच्या मदतीनें पुनः ब्रिटिशांचा पराभव केला. रणजितसिंगाच्या मनोरथानुरूप घडून आल्यावर ३ वर्षांच्या आंत तो मृत्यु पावला. त्याच्यामागून त्याचा मुलगा रणधीरसिंग हा गादीवर बसतांच त्यानें ब्रिटिश लोकांशीं राज्यप्रकरणसंबंधीं कडक नियम केले. त्यामुळें इंग्रजांस त्याचा फार राग आला. स्वस्थता मोठ्या श्रमानें राहिली. आणि पेंढाऱ्यांचे लढाईंत इ० सन १८१७ त राजानें कांटिंजन्सीचे स्वारांची मदत ब्रिटिश सैन्यास दिली. व त्या सैन्यानें थोड्या वेळांत पुष्कळ महत्वाचीं कामें केलीं. यामुळें ब्रिटिश सरकार फार खुष झालें.

इ०सन १८२३च्या आक्टोबर महिन्याच्या ७व्या तारखेस राजा मृत्यु पावला. त्याला संतति नव्हती ह्मणून त्याचा भाऊ बलदेवसिंग हा गादीवर बसला. राजा बलदेवसिंग यानें सुमारें १८ महिनेपर्यंत राज्य केलें. तो इ० सन १८२५ च्यां फेब्रुआरी महिन्याच्या २६ व्या तारखेस मृत्यु पावला. नंतर त्याचा मुलगा बलवंतसिंग यास ब्रिटिश सरकारच्या मदतीनें* गादीवर बसविलें. त्याचा चु-

*या वेळेपासून ब्रिटिश सरकारचा राजपुतान्यांत चहूंकडे पूर्ण अंमल बसला. सर्व संस्थानांत यांच्या सल्याशिवाय एखादा पत्र-

लत भाऊ दुर्जनसाल यानें केरवलीच्या राजाच्या मदतीनें याजवर मोठ्या युक्तीनें स्वारी करून त्यास पदच्युत करून कैद केलें. या वेळेस रेसिडेंट सर डेव्हीड आक्टरलोनी हे दिल्लीस होते. याकडे भरतपुरचें एजंटीचें काम होतें. त्यानें राजास यथान्याय गादीवर बसविण्यासाठीं फौज जमा करून शत्रूवर चाल केली.

गव्हरनर जनरल यास या गृहकलहाचा निकाल लढाईवांचून करितां येईल असें वाटल्यावरून व अशा अडचणीच्या प्रसंगीं आपणास आपलें वचन पाळलेंच पाहिजे, हें पूर्तपणीं मनांत आणल्या कारणानें त्यांनीं, आक्टरलोनी यानें हिंदुस्थान सरकाराला जी व्यवस्था करण्याविषयीं सूचना केली होती, त्याप्रमाणें सर्व व्यवस्था करून दुर्जनसालास कोणत्या रीतीनें गादीवरून पदच्युत करावें या विचारांत पडले. दुर्जनसाल जेव्हां पुष्कळच अन्याय करूं लागला तेव्हां अर्थात् त्याची रयतही त्याला, नाखुष होऊन त्या प्रजेनें दुर्जनसालास फारच त्रास दिला. यामुळें दुर्जनसाल यानें आपल्या राज्याचे हक्काबद्दल इंग्रज सरकाराचा आश्रय वगैरे मिळण्याविषयींची खटपट न

व्यवहार करणें झाल्यास सुद्धां राजेलोकांस यांची परवानगी पाहिजे झाली. ज्या वेळीं हे गोरकाय लोक राजपुतान्यांत आले त्या वेळीं यांची स्थिति पाहिल्यास हे एखाद्या यःकश्चित नोकरासारखें वागून पाहिजे तें हरएक काम करण्यास तयार होते. राजेलोकांच्या भेटीस हे आल्यास यांस हात बांधून राजे लोकांच्या तब्बेतिप्रमाणें वागावें लागे. पण आतां पहावें तों सर्व प्रकार उलटा होऊन गेला आहे. आतां या अंमलदारांची मर्जी राजे लोकांस संभाळतां संभाळतां भेधा उडून जाते.

करतां तो प्रथम आपले किल्याची दागदुजी करण्याच्या कामास लागला. शिवाय अन्य राजेलोकांपासून घोडेस्वार व पायदळ वगैरे मिळविण्याविषयींही त्यानें पुष्कळ खटपट चालविली होती. त्याप्रमाणें त्यास रजपूतराजे आणि मराठे लोक यांनीं पुष्कळ प्रकारची मदत देण्याचें कबूल केलें.

दुर्जनसाल याच्या या अन्यायी व राजकारस्थानी वर्तनामुळें देशांत चहूंकडे एकच धामधूम होऊन गेली होती. यामुळे ब्रिटिश सरकारानें शेवटीं अशा वेळीं उपेक्षा केली तर ह्याचा परिणाम कोठपर्यंत जाईल याचा थांग लागणार नाहीं, हें मनांत आणून आक्टरलोनीच्या मताप्रमाणें आगंतुक रीत्या दुर्जनसाल यास काढून बलवंतसिंग यास गादीवर बसवावें असा निश्चय केला.

"कमांडर इंनचीफ लॉर्ड कांपरमेर" याच्या हाताखालीं चांगला तोफखाना देऊन २५,००० लोकांनिशीं त्यास किल्यावर हल्ला करण्यास पाठविलें. इ० सन १८२५ त वेढ्यास आरंभ झाला. परंतु तटाच्या मातीच्या भिंती फार उंच व ६० फूट जाड, शिवाय पुढें मोठा खोल खंदक पाण्यानें भरलेला, यामुळें सुरुंग लावणें भाग पडलें. डिसेंबरच्या २३ व्या तारखेस या कृत्यास सुरुवात झाली.

इ० सन १८२६ च्या जानेवारींत सुरुंग लावल्यामुळें तट पडून त्यांचा प्रवेश झाला. नंतर १८–२० हल्ले करून तो किल्ला सर करून, दुर्जनसाल यास मोठ्या बंदोबस्तानें कैद करून अलहाबादेच्या किल्यांत नेऊन ठेविलें.

इ० सन १८२६ च्या फेब्रुवारींत बलवंतसिंग यास गादीवर बसविलें. त्या वेळीं हा लहान होता, ह्मणून याच्या संरक्षणाचें काम गतराजाचे कुटुंबाकडे सोंपवून त्यावर पोलिटिकल एजंटानें नजर ठेवावी असें ठरविलें. आणि कांहीं दिवसांनीं राणी मिरकुंवर हिनें कांहीं राज्य-कारस्थान करून एके प्रसंगीं तिनें राजवाड्यांत कित्येक दिवसपर्यंत मुलास कैद करून ठेविलें. यावर ही साहसी स्त्री ह्मणे कीं, कोणी या मुलाला मुक्त करील तर मी प्राण देईन. अशी भीति घातल्यावरून तिला अधिकारावरून दूर केलें; आणि राज्यांतील निरनिराळ्या सर्व खात्यांची व्यवस्था प्रधान मंडळीनीं आपले स्वाधीन करून घेऊन राज्याचा कारभार चालविला. सर्व व्यवस्था पोलिटिकल एजंटाचे हुकुमानें चालत होती.

इ० सन १८३० त दिवाण जवाहीर लाल मृत्यु पावल्या कारणानें या संस्थानचें मोठें नुकसान झालें. याकडे-गेल्या २५ वर्षेपर्यंत रेविन्यूच्या मुख्याचें काम होतें. याच्या मागून संस्थानांत पुष्कळ अव्यवस्था झाली होती, यामुळें इ० सन १८३१ त ब्रिटिश एजंटांनीं भोलानाथ नांवाच्या मनुष्यास वसुलाचे कामावर मुख्य नेमिलें. नंतर राज्याची व्यवस्था लागून चहूंकडे स्वस्थता झाली.

इ० सन १८३९ त राजा बलवंतसिंग यास राज्य-कारभार देऊन पोलिटिकल एजंट राज्यव्यवस्थेंतून मोकळे झाले. जी कांहीं थोडीशी फौज राजधानींत ठेविली होती ती सर्व तेथून काढून घेऊन राजास आपले राज्याचा यथायोग्य स्वातंत्र्यानें कारभार पाहण्यास सांगितलें. या

स्वातंत्र्याचा राजानें चांगला उपयोग केला.

राजा बलवंतसिंग हा गादीवर बसल्यापासून इ. सन १८४० पर्यंत भोलानाथ यानें राज्यकारभार चालविला होता. इतक्या अवकाशांत भरतपुरसारखा उत्तम राज्यकारभार चालल्याचें उदाहरण सांपडणें कठीण. त्या भरतपुरच्या उत्तम व्यवस्थेमुळें ब्रिटिश सरकारची मर्जी फार खुष होऊन इ. सन १८२५।२६ च्या सालीं झालेल्या लढाई बद्दलच्या खर्चाची रक्कम पुष्कळ तुंबली व ती त्याचें डोईजड झालेलें व्याज भरतपुरचे राजास सर्व माफ केलें. याची रक्कम १९,४९,००० रुपये होती. इ० सन १८९३ त राजा बलवंतसिंग मृत्यु पावला. यानेंही पुष्कळ महत्वाचीं कामें केलीं. याच्या मागून त्याचा मुलगा जसवंतसिंग हा गादीवर बसला, त्या वेळीं याचें वय लहान होतें.

राजा लहान असल्यामुळें राज्याचें काम पोलिटिकल एजंट यांनीं रिजेन्सीप्रमाणें ५ सरदारांकडून चालविलें होतें. राजा जसवंतसिंग वयांत आल्यावर त्यास पोलिटिकल एजंट यांनीं सरकारचे हुकुमानें पूर्ण अधिकार * दिल्यावर राजेसाहेबांनीं राज्यव्यवस्था फार उत्तम रीतीनें चालविली. पूर्वीचें कामगार तसेंच ठेऊन राज्यात सुधारणा पुष्कळ केल्या. यांनीं प्रजेला फार खुष ठेविलें. रयतेपासून जुलमानें पैसा काढण्याकरितां

* या संस्थानांतील प्रजेचे मोठें नशीब म्हणूनच राजे साहेबांस लागलाच पूर्ण अधिकार मिळाला. नाहींतर पोलिटिकल एजंटाच्या मर्जीस न येतें तर त्याला काय इलाज होता! हल्लीं सावंतवाडी संस्थानचे मालक वयांत आले तरी त्यांस अधिकार मिळूं नये हें त्या प्रजेचें मोठें दुर्भाग्यच समजलें पाहिजे.

विनाकारण नाहीं नाहीं ते कर* न बसवितां काळीच्या उत्पन्नावरच खर्च भागून पैसा पुरत होता. इ. सन १८६८ चे जानेवारीचे २६ वे तारखेस महाराजास मुलगा झाला. यांना दत्तकाची परवानगी आहे. यांस १७ तोफांची सलामी आहे. राज्यव्यवस्था चांगली आहे. राजा-विरुद्ध प्रजेस कधींही एजंटाकडे फिर्याद करावी लागत नाहीं. प्रजेच्या अनुमतानें राज्यकारभार चालतो, येणे-करून एथील प्रजा फार सुखी आहे.

प्रकरण चवथें समाप्त.

## प्रकरण पांचवें.

# बिकानेर.

याचें क्षेत्रफळ १७,६७६ चौरस मैल आहे. लोक-संख्या ५,३९,००० आणि उत्पन्न ४,००,००० रुपये आहे. याचा मुलूख भावलपुरच्या पूर्वेस आहे.

जोधपूरचा सहावा राजा जोध याचा मुलगा विकसिंग

---

*. कितीएक इंग्लिश कामगार असें ह्मणतात कीं, संस्थाना-पेक्षां ब्रिटिश अमलांतील प्रजा फार सुखी आहे. त्यांना कधीं त्रास किंवा हाल भोगावे लागत नाहींत असें ह्मणतात, पण हें त्यांचें ह्मणणें अगदीं चुकीचें आहे. ब्रिटिश अमलांतील प्रजेपेक्षां संस्थानांतील प्रजा फारच सुखी आहे. त्यांना ब्रिटिश अमलांतील कररूपी जळवांचा त्रास नाहीं व भलभलते कर काढून प्रजेस अन्नान्नगत करून टाकित नाहींत. हल्ली ब्रिटिश अमलांतील प्रजा करानें इतकी नाडली आहे कीं वेळेवर त्यांना खाण्याचीही मारामार आहे. तशी स्थिति संस्थानांतील प्रजेची नाहीं.

यानें बिकानेरच्या राज्याची स्थापना केली. बिकासिंग हा आपल्या बरोबर चांगले हुशार ३००लोक घेऊन मरुप्रदेशांत कोठेंतरी एक राजधानी स्थापावी, या हेतूनें आपल्या पितृगृहांतून बाहेर पडला. आपण पराक्रमानें शत्रूंस मारावें किंवा आपण मरावें, हा कृत निश्चय करून त्यानें हातांत तरवार धारण केली होती.

बिकसिंग यांस प्रथम जंगलीसाकल भेटला, यांनें भटी लोकांशीं परिचय करून दिल्यावर त्यानें त्याच्या मुख्याच्या मुलीशीं लग्न केलें. ही मुलगी गुणांनीं व रूपानें फारच चांगली होती. पुढें हळूहळू कोरम देशाचे खालपर्यंत त्यानें वसाहत केली. तेथें त्यानें एक किल्ला बांधला, नंतर त्यानें युक्तीनें जाट अथवा जिटी लोकांवर आपलें वजन बसविलें; पुढें त्याला २,६७० रुपयाचा एक चांगला मुलूख मिळाला तेथील लोक धनगर. त्यांस विद्यावृद्धि कांहीं एक नाहीं. त्यांची संपत्ति ह्मणजे मेंढरें. हे लोक आपल्याजवळच्या त्या मेंढरांपासून जी लोंकर वगैरे उत्पन्न होत होती ती विकून त्याच्यावर उपजीविका करीत असत. बिकसिंग यांच्याकडे आल्यावर या लोकांनीं त्याचेबरोबर कांहीं ठराव करून घेऊन त्यास आपलें स्वामित्व दिलें, ते ठराव असे:-

१ बिकसिंगानें त्यांच्याशीं नीतीनें वागलें पाहिजे. २ पश्चिमेकडून लुटारू लोक नेहमीं स्वाऱ्या करितात त्यांपासून त्यांचें संरक्षण करावें. ३ समाजाचे हक्क व वहिवाटीमध्यें हात न घालतां त्यांचें संरक्षण करावें. या गोष्टी कबूल केल्यावर त्या लोकांनीं बिकसिंगास वंशपरंपरेनें आपल्या स्वा-

मित्वाचा हक्क देऊन प्रत्येक परगण्यांतील घरांवर १ रुपया, आणि १०० बिघ्यांवर २ रुपये सारा देण्याचें कबूल केलें.

विकासिंग याचें ह्मणणें असें होतें कीं, माझे वंशजांच्या हातून मला विधिपूर्वक राज्याभिषेक झाल्यावांचून राज्य-पद उपभोगणें चांगलें नाहीं. तर हा विधि होईपर्यंत त्याला स्वामित्वच पोंचत नाहीं, ह्मणून पुढें बिकासिंगाच्या आप्तांनीं त्याला विधिपूर्वक राज्याभिषेक केला. बिकासिंग यानें लुटारू लोकांचा पराभव करून त्यांस जिंकिलें. नंतर भटी लोकांस जिंकून त्यापासून भागोर घेतलें. या प्रांतांत त्यानें इ० सन १४८९त बिकानेर नांवाची राजधानी स्थापन केली. ती राजधानी हल्लीं मोठ्या भरभराटींत आहे व तेथील प्रजा सुखी आहे. या वेळेस मंदुसराहून निघून त्याला ३० वर्षें झालीं होतीं.

बिकासिंग हा इ०सन १४९५त मृत्यु पावला. यानें पुष्कळ प्रकारचीं महत्त्वाचीं कामें करून प्रजेच्या मतानें वागणूक केल्यामुळें याची कारकीर्द फारच सुखकर अशी होती. रयतेवर कोणताही कर नसून व्यर्थपैसा कधींच खर्च केला नाहीं. याच्या मागून त्याचा दुसरा मुलगा कर्ण हा गादीवर बसला; आणि गार्सी यानें गिर्सीसिन आणि आगेसिर यांची स्थापना केली. हे दोघेही मोठे पराक्रमी व शूर असे होते. बापाप्रमाणेंच यांची कारकीर्द सुखकर होती.

कर्णानें भटी लोकांपासून पुष्कळ मुलूख जिंकून आपले राज्यास जोडले. त्याला ८ मुलें होतीं. त्यांपैकीं वडील हा बाप असतांनाच वेगळा झाला होता यामुळें जिवितसिंग हा कर्णाच्या मागून गादीवर बसला. त्यानेंही पुष्कळ पराक्रम करून राज्य वाढविलें. त्याच्यामागून त्याचा वडील मुलगा

कल्याणसिंग हा गादीवर बसला; आणि त्याच्या मागून त्याचा वडील मुलगा रायसिंग हा इ० सन १५७३ त गादीवर बसला. याचे राज्यांत बिकानेर उदयास आलें. रायसिंग हा आपला मेहुणा जो अकबर याचा मुख्य सुभेदार झाला. बादशहानें त्यास मोठमोठे किताब देऊन उंच पदावर चढविलें. त्याला अकबर बादशहानें ४,००० घोडेस्वारांचा मुख्य करून त्याला राजा आणि हिस्सारचा अधिपति असा किताब दिला. जोधपूरचा राजा मालदेवसिंग याजवर जेव्हां अकबराची खप्पा मर्जी झाली, तेव्हां त्यानें रायसिंगास प्रथम पुष्कळ प्रांत दिले व त्यास खुष केलें.

राजा रायसिंगानें बादशहाची मदत घेऊन तो बिकानेर येथें आला आणि शत्रूस जिंकून यानें या लोकांचे फार हाल केले. रजपुतांनीं जाट लोकांचें स्वामित्व हरण करून त्यांना केवळ दासपदावर आणून ठेविलें होतें. पण राजा रायसिंगाचे कारकीर्दींत तर ते पूर्ण सेवक बनून गेले.

राजा रायसिंग हा नेहमीं आपलें सैन्य व फौज अकबराबरोबर नेत असे. अमदाबादच्या सुभेदारास त्यानें एका लढाईंत जेरीस आणून ठार मारिलें. याबद्दल त्याची कीर्ति फार प्रसिद्ध आहे. त्यानें आपल्या कन्येचा*

*द्रव्याचा लोभ हा मनुष्यास किती असावा याची तर गणतीच नाहीं. राजेलोकसुद्धां द्रव्यासाठीं आपल्या मुली मुसलमानांस देऊन राज्य वाढवित. असल्या राजे लोकांस नीतिमान लोक कधींही चांगलें ह्मणणार नाहींत. हल्लींही कित्येक लोक नोकरी किंवा बढती मिळविण्याकरितां वरिष्ठास घरप्रपंचही देण्यास खुषी असतात. असल्या अधमाधम मनुष्यांचें तोंडसुद्धां बघूं नये.

अकबराचे मुलाशीं विवाह केला. यामुळें त्याला यानें पुष्कळ मुलूख दिला. त्याचा मुलगा पूर्वज यानें शहाजहानाशीं बादशहाच्या गादीवर बसण्यासाठीं पुष्कळ लढाया केल्या. परंतु त्या सर्व व्यर्थ झाल्या.

रायसिंग इ. सन १६३१ त मृत्यु पावला. त्याचे मागून त्याचा मुलगा कर्ण हा गादीवर बसला. औरंगजेब आणि दारा यांच्या लढायांत कर्ण यानें दारास साह्य केलें. औरंगजेबानें कर्णास मारण्याचा पुष्कळ प्रकारचा बेत केला होता, पण त्यांतून तो युक्तीनें बचावला गेला. तो इ. सन १७७४ त मृत्यु पावला. त्याचे मागून अनुपसिंग हा गादीवर बसला. त्याचे ताब्यांत विजापूर व अवरंगाबाद हीं दोन राज्यें होतीं. हा ५,००० स्वारांचा मुख्य अधिकारी होता. हा बादशहाच्या सैन्याबरोबर काबुलास गेला होता, तो परत आल्यावर बिकानेर येथें इ. सन १७०९ त मृत्यु पावला. त्याच्या मागून त्याचा मुलगा सुरूपसिंग हा गादीवर बसला.

औरंगजेबानें सुरूपसिंगाचे बापास अब्दोणीचा किल्ला व प्रांत दिला होता. तो सुरूपसिंगाच्या बापानें बादशहाचे सैन्यास मदत केली नाहीं ह्मणून बादशहानें तो परत घेतला होता, तो सुरूपसिंगानें मोठ्या प्रयत्नानें पुन: परत मिळवित असतां मरण पावला. त्याचे मागून सुजैमसिंग व झोरावारसिंग हे दोन राजे झाले. त्याच्या मागून गजसिंग राजा झाला. हा भटी आणि भावलपुर यांच्या सीमेच्या तंट्याबद्दल लढाया करीत असतां मृत्यु पावला. त्याला ६१ मुलें होतीं, त्यांतून ६ त्याचीं आवडतीं होतीं. त्याच्या

मागून इ० सन १७६७ त त्याचा मुलगा राजसिंग हा गादीवर बसला.

पूर्वीच्या राजाचा ६ वा मुलगा सुरतसिंग याच्या आईनें* विषप्रयोग केल्यावरून राजसिंगानें फक्त १३ दिवस राजपदाचा उपभोग घेतला. त्याला प्रतापसिंग व विजयसिंग असे दोन मुलगे होते.

सुरतसिंगानें राजसिंगाला विषप्रयोग करविला. याचें कारण राज्यलोभ होय. सुरतसिंग लवकरच स्वरक्षक झाला. हा मोठा.साहसी व दुराचारी होता. त्याचे दोन भाऊ सुरतसिंग व अजितसिंग हे आपल्या घरीं स्वतःचें रक्षण करण्याकरितां निघून गेले.

सुरतसिंगानें आपले सरदार, अमीरउमराव, मानकरी व संस्थानिक वगैरेस मोठमोठ्या देणग्या देऊन त्यांस संतुष्ट ठेविलें; नंतर कांहीं दिवसांनीं त्यानें त्यांपैकीं कांहीं सरदारांस स्वतः राज्य करण्याचा आपला दुष्ट हेतु कळविला. हा याचा हेतु ऐकून याबद्दल पुष्कळ प्रकारच्या हरकती त्यांनीं घेतल्या, तरी त्यानें कांहींएक ऐकिलें नाहीं. सुरतसिंग हा मोठा दक्ष, हुशार व चाणक्ष असल्या कारणानें त्यानें घोडेस्वार जमविले व हल्ला केला; आणि सर्व सरदारांस जिंकून त्यांचा पराभव केला. नंतर बिका-

* एखाद्या विषयाच्या नादीं स्त्रिया लागल्या म्हणजे त्या काय करतील आणि काय नाहीं याचा कांहीं नेम सांगवत नाहीं, नाद पुरा होण्याकरितां प्रत्यक्ष पोटच्या पोरसुद्धां मारण्यास भीत नाहींत अशा नीच कामांध स्त्रीयांस काय म्हणावें त्या व्यसनाधिन झाल्या म्हणजे पाहिजे तें करूं शकतील. याच मासल्याचीं उदाहरणें पाहूं गेल्यास पुष्कळ सांपडतील.

नेरास गेला. आणि तेथें सर्व अडथळे दूर करून राज्य मिळविण्याकरितां आपल्या पुतण्याचा *क्रूरतेनें प्राण घेऊन राज्य आपल्या ताब्यांत घेतलें. सुरतसिंगाची एक प्रामाणिक बहीण होती, तिच्याजवळ तिचा दुसरा एक पुतण्या होता. तिनें त्या पुतण्याला सुरतसिंगाच्या भितीनें अगदीं जपून बाळगिलें होतें, यामुळें तेथें सुरतसिंगाचें कांहीं एक चालेना. तेव्हां त्यानें तिला न आवडणाऱ्या पुरुषाशीं बळेंच तिचें लग्न केलें. व ती मुलाजवळ नाहीं अशी संधि साधून त्या पुतण्यास ठार मारिलें. नंतर त्यानें स्वतः राजा असा अघोरपणानें किताब धारण केला.

इ० सन १८०१ त सुरतसिंगचें सर्व राज्य बिनदिक्कत झालें. तो मोठा शूर होता, त्यानें भटी लोकांचा पुष्कळ मुलूख जिंकून आपले राज्यास जोडिला. परंतु जोधपूरच्या गृहकलहांत त्यानें धोकलसिंगाचा पक्ष घेतल्या कारणानें ५ वर्षेपर्यंत त्यानें आपल्या राज्याचें सर्व उत्पन्न व्यर्थ त्याचे भरीस घातलें. या कामांत त्यास यश आलें नाहीं; पैसे फार खर्च झाले. तेव्हां अर्थातच प्रजेवर जुलूम करण्याची त्यास बुद्धि झाली. यामुळें त्याला फार त्रास भोगावे लागले.

इ०सन १८२८ त सुरतसिंग मृत्यु पावण्याचे पूर्वी त्याच्या देशाचा पेंढाऱ्याच्या लढाईंत ब्रिटिशसरकाराशीं एक अट्टीचा तह केलाच होता. राजानें इंग्रजसरकारास मदत

---

* असें क्रूरकर्म करणाऱ्या मनुष्यास परमेश्वर कधीं ना कधीं तरी चांगलें शासन करितो. त्याप्रमाणें याचे पुष्कळच हाल झाले व ते हाल दुसऱ्यास पाहवतही नव्हते.

करावी असें ठरलें होतें व इंग्रजांनीं त्याच्या प्रजेचीं बंडें वगैरे सर्व मोडून त्याचें राज्य त्याचे स्वाधीन करावें, याबद्दल खंडणी वगैरे नव्हती. सुरतसिंग मृत्यु पावला तेव्हां त्याचे राज्यांत मोठा घोंटाळा होऊन गेला होता. सरदार लोकांनीं उघडपणें बंड केलें होतें, यामुळें राज्यांत पुष्कळ गेंडाळीं झालीं होतीं. त्याचे मागून रतनसिंग हा गादीवर बसला तेव्हां राज्यांत थोडीशीं शांतता झालीं.

राजा गादीवर बसतांच त्यानें पूर्वीं आपले प्रजेस जेसलापासून जीं दुःखें झालीं होतीं त्यांचा सूड उगविण्यासाठीं त्यानें जेसलमीरावर स्वारी करण्याची तयारी केली. राजानें शत्रूंच्या राजधानीपर्यंत प्रवेश केला. हें राजाचें आचरण ब्रिटिशसरकारच्या तहाविरुद्ध होतें. जेसलमीरच्या राजानें फौज तयार केली. जोधपूरचे व जयपूरचे राजे आपआपल्या हद्दीवर सैन्यासह येऊन ठेपले. आतां खरोखर राजपुतान्यामध्यें दारुण युद्धामी पेटतो असें सर्वांस भासूं लागलें व त्यामुळें सर्व घाबरून गेले होते. इतक्यांत इंग्रजसरकारानें सर्वांचें ऐकून घेऊन सर्वांस प्रिय असें तह केलें, यामुळें आलेलें विघ्न टळलें हें पाहून सर्वांस आनंद झाला.

राजाचें व सरदारांचें पुढें जमेना. राजाच्या आंगांत सरदारांचा पाडाव करण्याची शक्ति नव्हती. त्यानें दिल्लीस ब्रिटिशरेसिडेंट होता त्याला मदतीविषयीं लिहिलें. त्यांनीं घरगुती अव्यवस्थेबद्दल जें तुमचें व सरदारांचें वैमनस्य पडलें आहे, त्यांत सरदारांच्याविरुद्ध ब्रिटिशसरकार तुम्हांस मदत करूं इच्छीत नाहीं असें साफ उत्तर दिलें.

इतक्यांत पुनः बिकानेर व जेसलमीर येथिल राजांमध्यें आणखी तंटे सुरू झाले.

इ० सन १८३६ त तर दोघेजण अगदीं हातघाईवर येऊन पोंचले. त्या वेळीं ब्रिटिशांनीं आपला एक गोरा कामगार या दोघांची एकी करण्याकरितां पाठविला होता. दोघां राजांनीं आपलीं पूर्वींचीं वैमनस्यें टाकून देऊन पुनः ते एकमेकांशीं मैत्री करूं लागले. राजानें पुनः सरहद्दीच्या संबंधानें बरीच चळवळ सुरू केली. या चळवळींतून राजास आपलें आंग काढण्यास फार प्रयास पडले.

इ० सन १८६२ त रतनसिंग मृत्यु पावला. त्याच्या मागून सरदारसिंग हा गादीवर बसला. सरदारसिंगानें बंडाचे वेळीं इंग्रज लोकांस चांगला आश्रय दिला इतकेंच नाहीं, परंतु हन्सी व हिस्सार या प्रांतांत तो बंडवाल्यांशीं पुष्कळ लढला. यानें स्वतः प्राणाचीही परवा न करतां शत्रूंचा मोडकरण्याकरितां पुष्कळ झटला व त्याप्रमाणें त्यांस यशही आलें. याचें हें शूरत्व पाहून ब्रिटिश अंमलदारांनीं याची फार वाहवा केली. तसेंच याचें सैन्य गोऱ्या व काळ्या लोकांपेक्षां मनांत भीति न धरतां शूरपणानें लढलें व शत्रूंचा पिच्छाही चांगला पुरविला. हें पाहून ब्रिटिश अंमलदार फार खुष झालें. व या कामगिरिबद्दल राजास ब्रिटिश सरकारांनीं ४१ चांगलें गांव बक्षिस दिलें.

पुढें कांहीं दिवसांनीं सरहद्दीबद्दल पुनः तंटे सुरू झाले. त्यांबद्दल जोधपूर प्रांतांत इतकी गडबड उडाली कीं, इंग्रजसरकारास तहाची आठवण देणें भाग पडलें. याच

वर्षीं बक्षिस दिलेल्या ४१ गांवांमध्यें पुष्कळ अव्यवस्था झाल्या कारणानें इंग्रज सरकारानें मध्यें पडून झालेली अव्यवस्था मोडण्याकरितां एक कमिशन नेमिलें व त्यांत चौकशीअंतीं असें दिसून आलें कीं, रयतेपासून बळजोरीनें दुप्पट जमिनीचा वसूल घेतला इ० सन १८६१ पासून तों इ० सन १८६७ पर्यंत ९०,००० रुपये घेण्याचा असून तो जुलमानें राजाचे अधिकाऱ्यांनीं २,००,००० रुपये वसूल घेतला. यामुळें प्रजा फार बेदिल झाली आहे असें कमिशानें हिंदुस्थान सरकारास कळविलें. तेव्हां व्हाइसरायानीं या अव्यवस्थेबद्दल राजाला एक पत्र लिहून त्यांत चांगले प्रामाणिक व ज्ञानी असे अधिकारी नेमण्याविषयीं सुचविलें, व याप्रमाणें सर्व व्यवस्था राजेसाहेबांनीं केली. यांस १७ तोफांची सलामी आहे. हल्लीं राज्यकारभार फार चांगल्या तऱ्हेनें चालतो. ब्रिटिशसरकारच्या राज्याप्रमाणें यांनीं आपल्या राज्यांत कायदे* कानू सुरू करून कामगारही तसेच हुशार नेमिलेले आहेत.

## प्रकरण पांचवें समाप्त.

*कितीएक संस्थानांत अशी रीति आहे कीं, अंमलदार लोकांकडे कायद्यांचीं पुस्तकें नवीं होण्याबरोबर संस्थानांतून मिळतात. परंतु या लोकांस त्यांतील लिपी समजत नसल्यानें तीं पुस्तकें १०-१० वर्षें झालीं तरी कोरींच असतात. प्रत्येक खात्यांतील मुख्यांस काम कसें करावें हें समजत नसल्यानें खुनाच्या चौकशीस केव्हां त्याच्या कायद्याचें कलम पाहण्याची वेळ येते.

## प्रकरण सहावें.

# जव्हार.

या संस्थानच्या चारही बाजूंनीं ठाणें जिल्ह्याची हद्द आहे. याचें क्षेत्रफळ ५३४ चौरस मैल असून लोकसंख्या ४७,६३३ आहे. वसूल सुमारें दीड लाख रुपये होत असतो.

या संस्थानांत सर्व रानटी लोकांची वस्ती आहे; त्यामुळें भरंवशालायक अशी येथील प्राचीन माहिती चांगली मिळत नाहीं. दंतकथेवरून असें कळतें कीं, या संस्थानचा मूळ संस्थापक, कोणी जायबा या नांवाचा मनुष्य होता, त्यास एका फकिराच्या अनुग्रहानें हें संस्थान मिळालें. त्या फकिरानें पुढें जीवंत समाधि घेतली. हल्लीं त्याचें थडगें येथील राजवाड्याजवळच असून दरगुरुवारीं रात्रीं त्याचा उरूस भरत असतो. ही एक प्रकारची माहिती झाली.

दुसरे कित्येक लोक असें सांगतात कीं, इ. सन १३४१ त जायबानें कांहीं लोक जमवून जव्हारचे आसपासच्या डोंगराळ प्रदेशांत पुष्कळ लुटालूट आरंभिली. आणि शेवटीं तो सर्वच रानटी मुलुख आपल्या ताब्यांत घेऊन तेथें तळ देऊन स्वामित्वानेंच राहिला. त्या वेळीं हिंदुस्थानांत मुसलमानी राज्याची संस्थापना व तत्संबंधानें चहूंकडे दंगाच चालू होता. चार हत्यारबंद लोक जमवून लूटालूट करण्याचें सामर्थ्य ज्याचे आंगीं असेल त्यानें खुशाल एखाद्या बेवारसी प्रांताचें स्वामित्व बळकावून

बसावें. तत्कालीन दिल्लीच्या सार्वभौम बादशाही सरकारास त्याची कधीं गरज लागेल तेव्हां मग पहातां येईल. असा बेबंदशाईचा प्रकार असल्यामुळें जायबाचें हें कृत्य त्याला बराच काळपर्यंत पचलें. शिवाय जायबानें जो हा प्रदेश आपल्या ताब्यांत घेतला तो आधींच डोंगराळ, त्यांत रानटी लोकांच्या तुरळक वस्तीचा, त्यामुळें सुद्धां तिकडे कोणाचें लक्ष्य गेलें नसेल. आणि जरी गेलें असलें तरी दरबारचे बखेडे निवारण करून असल्या दूर प्रदेशांतला बंदोबस्त पहाण्यास त्या वेळच्या बादशाही सरकारास पुरेशी फुरसूद, सुलभतर साधनें, आणि योग्य प्रकारचीं माणसें चटकन मिळणें ही दुरापास्तच होतें.

हल्लीं जसें आगगाडी-तारायंत्र-पोस्ट इत्यादि साधनांच्या योगानें देशांतील कितीहि दूरच्या कोपऱ्यांत कोणीं एवढेंसें 'कुकू' केलें कीं, आमच्या सरकारास शैलशिखरावरहि कळतें, तसें त्या वेळीं मुळींच नव्हतें. इतकींहि साधनें सुलभ असतां आणि वाटेल तशीं माणसें आंगावर लोटण्याचें सामर्थ्य असतां, हल्लींसुद्धां* मध्यप्रांतांत लुटालूट करून सरकारास व प्रजेस त्रास देत असलेल्या प्रसिद्ध तंट्या भिल्लाचा पत्ता काढून त्याला पकडणें हें आमच्या सरकारास किती कठीण झालें आहे, हें लक्ष्यांत आणलें ह्मणजे, मोंगलाईच्या अखेरीस जायबानें बळकाविलेल्या या रानटी मुलुखाबद्दल आश्चर्य वाटावयास नको.

जायबानें हा मुलुख आपल्या ताब्यांत घेतला त्या

*१८८६, ८७,–८८–८९ मध्यें.

वेळीं त्यांत लोकवस्तिसुद्धां ह्मणण्यासारखी नव्हती. बोलून चालून डोंगराळ मुलूख. इतर ठिकाणीं लुटालूट करून सत्तेनें येऊन लपून राहण्यास मात्र ही जागा त्याला व त्याचे लोकांना उपयोगी पडत असे. अस्तु. जायबानंतर त्याचा मुलगा नेमशा हा त्या मुलुखाचा अधिपति झाला. यानेंहि आपल्या बापाचा लुटीचाच धंदा पुढें चालविला होता; परंतु यानें चालविलेल्या दंगलीनें खुद्द मोंगललोकांस देखील त्रास होऊं लागल्यानें त्यांचें लक्ष्य याच्याकडे साहजिक वळलें. तेव्हां त्यांनीं याजवर आपला एक सरदार पाठवून त्याजकडून याची खोड बरीच मोडली. याचा अनेक वेळां पराभव झाल्यानें हा इतका जेरीस आला कीं, यास तो मुलूख सोडून देशोधडीस लागण्यावांचून गत्यंतर राहिलें नाहीं.

पुढें लागलीच मोंगल सैन्यास तो डोंगराळ मुलूख मिळवून कांहीं फायदा नाहीं असें वाटल्यावरून तें सोडून गेलें. असल्या रानटी मुलुखांत बंदोबस्त ठेवल्यानें कांहीं फायदा नाहीं असें त्यांना वाटल्यावरून व नेमशा यास झालेला त्रास पुरे आहे असेंहि मनांत आल्यावरून त्यांनीं आपलें सैन्य तेथून काढून नेलें. त्या वेळचे हे मोंगललोक तरी लुटारूंचेच बंधु होते असें त्यांच्या या कृत्यावरून ह्मणावें लागतें! ज्या मुलुखांत आपल्या खजिन्यांत भर करण्यासारखा लग्गा आढळेल तेवढ्यावर यांची नजर; तेथें मात्र बंदोबस्त ठेवला पाहिजे. बाकी जेथून प्रत्यक्ष अगर परंपरया आपल्या रयतेस किंवा आपणास त्रास पोहोंचण्याचा संभव फार अशा ओसाड, डोंगरी, रानटी

लोकवस्तीच्या ठिकाणांविषयीं, केवळ तेथून खजिन्याची मिळकत नाहीं इतक्या सबबीनें, ते निष्काळजी बनले. त्यांनीं आपलें सैन्य परत नेलें; आणि पुनः त्या मुलुखाचें स्वामित्व नेमशाचे हातीं सोडून दिलें. नेमशानें मोंगलांचें सैन्य जातांच आपल्या मालकीची पुनः संस्थापना करून लौकरच ह्मणजे इ. सन १३४१ त "राजा" हें पद सुद्धां घेतलें. दिवसानुदिवस, रानटीच कां होईना, पण त्याच्या राज्यांतली प्रजा वाढत चालली. त्याचे मागून भीमशहा गादीवर बसला. त्यानें जरा जास्त हालचाल करून आपल्या छोट्याशा मुलुखाचा आणखी कांहीं विस्तार वाढविला; त्याचे वेळीं त्या मुलुखांत लांकडाचें उत्पन्न बरेंच होतें.

भीमशहानंतर महमदशहा गादीवर बसला. हा निपुत्रिक वारल्यामुळें त्याचे मागून दत्तक मुलगा कृष्णशहा हा गादीचा मालक झाला. त्याच्या कारकीर्दींत विशेष गोष्ट कांहीं झाली नाहीं. त्यानंतर (दुसरा) नेमशहा, त्याचे मागून विक्रमशहा व पुढें पतंगशहा हे गादीवर बसले. या सर्वांचा उद्योग ह्मटला ह्मणजे शिकार करून अगर लुटालूट करून असावें ह्यापेक्षां दुसरा कांहीं एक नसे. राज्यकारभार ह्मणजे काय आणि तो करावयाचा कसा ह्याची त्यांना ओळखसुद्धां नव्हती. तरी दिवसानुदिवस यांच्या ताब्यांतील मुलुखाचें उत्पन्न बरेंच वाढत चाललें होतें व यांच्या ऐन भरभराटीचे काळीं तें नऊ लक्षांपर्यंत वाढलें होतें. एवढेंच जर हें उत्पन्न यांणीं स्वस्थिति सुधारण्याकडे लावून नीट व्यवस्थेनें राहते तर यांचें संस्थान

कांहींसें नांव रूपासहि आलें असतें. पण तितक्यांत ह्मणजे इ. सन १७६०त पेशवे सरकारचा व यांचा कलह लाग-ल्यामुळें त्यांनीं यांचा बराच मुलुख हिसकावून घेतला. त्यामुळें या संस्थानास पुष्कळ उतरती कळा लागली.

इ.सन १७८२त, ह्मणजे श्रीमंत सवाई माधवराव पेशवे यांच्या कारकीर्दीत या संस्थानाचें उत्पन्न दोन लाखांवर येऊन बसलें होतें. या वेळींहि संस्थानिक बरेच नम्र झाले होते व पेशवेसरकाराशीं सख्यसंबंध यांणीं ठेवल्यामुळें पुढें लौकरच त्यांजकडून यांना स्वतंत्रपणें वागण्याची परवानगी मिळाली होती. या सुमारास (दुसरा) पतंगशहा संस्थानचा मालक होता. हा इ. सन १७९२ त मृत्यु पावला. याचे मागून ५ राजे गादीवर बसले, त्यांनींहि आपल्या चालुवहिवाटीप्रमाणेंच वागणूक ठेविली होती.

आसपास शेजारीं सुधारलेल्या ब्रिटिश राज्यसत्तेचा अंमल असून व त्या अमलांतील सुशिक्षित व समंजस प्रजेशीं दळण वळण ठेवण्याचीं साधनें सुलभ असून अद्यापि देखील ह्या संस्थनच्या प्रजेचा जर रानटीपणा गेलानाहीं, तर त्या वेळीं तो किती परिपूर्णावस्थेत होता याची कल्पना वाचकांना करतां येईलच. वस्त्र तर बिचाऱ्यांना ठाऊकच नव्हते. झाडांच्या सालीच्या लंगोटया स्त्रियांची विशेष ठिकाणची कांहींशी लज्जा राखीत. बाकी सर्वत्र दिगंबर वेष! खाणें कंदमुळें वगैरे. प्रजेची वर्गवारी ह्मटली ह्मणजे कोळी, वारली, ठाकुर, व कातकरी हीं होय.

पतंगशहाचे मागून (दुसरा) विक्रमशहा गादीवर बसला. हा इ. सन १८२०त मृत्यु पावला. त्या वेळेस त्याची

बायको सगुणाबाई ही गरोदर होती. तीस पुढें जो मुलगा झाला तोच गादीचा मालक कंपनीसरकारानें कबूल केला. मुलगा लहान असल्यामुळें राज्यकारभार सगुणाबाईच पहात होती. आणि वास्तविक पहातां राज्यकारभार तरी तो काय पहावयाचा होता! ना जमाखर्च, ना दप्तर, ना खर्डा! बाई नसती तरी मुलालासुद्धां असला कारभार हाकण्यास पंचाईत पडली नसती. इ०सन १८६७ मध्यें मुंबई मुकामीं हा राजा मृत्यु पावला. त्या वेळीं त्याचे मांडीवर विक्रमशहा नांवाचा एक १६ वर्षांचा मुलगा बसविला; पण तो दोनच महिन्यांनीं मरण पावला. त्यानंतर त्याचे बायकोच्या मांडीवर पतंगशहा नांमे एक मुलगा दत्तक देऊन त्यास गादीचे मालक केले. या मुलाचा दत्तक होण्यास वारसा पोहोंचत नव्हता, अशाबद्दल पुष्कळ वाद पडला होता. परंतु हाच शेवटीं खरा वारस ठरून गादीची मालकी यास मिळाली व हा वयानें लहान असल्यामुळें याची मातोश्री गोपिकाबाई, व एक इंग्रज कामगार यांच्या तर्फें राज्यकारभार चालू झाला.

इंग्रजसरकारचें सार्वभौमत्व सुरू झाल्यापासून या संस्थानांत दप्तराची व त्यामुळें व्यवस्थित राज्यकारभाराची थोडीशी तरी स्थापना झाल्याचें दिसतें. कारण ह्यापुढें येथें निराळा कारभारी नेमण्याची रीत दिसूं लागली. हा कारभार त्या वेळीं मि. कुवरजी शापुरजी नामक एका गृहस्थाचे हातीं होता. यांणीं संस्थानाच्या दप्तरी व्यवस्थेंत बरीच सुधारणा केली, व इतरहि रीतीनें सर्व बाबतींत चांगला बंदोबस्त ठेवण्याची खटपट चालविली. पण यांच्या अशा करणीनें आजपर्यंतच्या बेबंदशाहीनें ज्यांची

पोळी पिकत असे, त्यांना अर्थातच अवघड वाटून हा कांटा काढून टाकण्याच्या यत्नास ते लागले. त्यांनीं मि. कुवरजी यांच्या संबंधानें अनेकप्रकारचे अर्ज सरकारांत करून सरकारचें मन बरेंच कलुषित केलें. शेवटीं सरकारच्याहि मनांत संशय उत्पन्न होऊन यांच्या कारभाराची चौकशी करण्याकरितां मि. हॉवलॉकसाहेब सी. एस. यास पाठविलें. चौकशींअंती यांना असें दिसून आलें कीं इंग्रजी पद्धति प्रमाणें कामाची व्यवस्था नाहीं. तरी त्यांत खोटसाळपणा झालेला असावा असें कांहीं आढळण्यांत येत नाहीं. एकंदरींत निष्काळजीनें व्यवस्था राहिल्यानें गोंधळ मात्र झाला आहे असा सरकारांत रिपोर्ट केला.

या रिपोर्टावरून सरकारानें मि. कुवरजीवर खटला सुरू केला. त्यांत यांच्यावर एकहि गुन्हा शाबीद झाला नाहीं. तेव्हां ते कामाचा राजीनामा देऊन संस्थानास रामराम करून चालते झाले.

अस्तु एकंदरींत मि. कुवरजी यांनीं संस्थानची व्यवस्था सुधारण्यासाठीं केलेली खटपट व्यर्थ जाऊन त्यांस कार्यसादु लोकांपासून दूर व्हावें लागलें.इ. सन १८७० त एक दुसरा कारभारी नेमला. पुढें त्यानंतर राजेसाहेब वयांत येत तोंपर्यंत२ कारभारी झाले.

इ. सन. १८७७ या वर्षी पतंगशहा राजेसाहेब वयांत आले. व त्याच वर्षी त्यांना आपल्या संस्थानची पूर्ण मुखत्यारी मिळाली. या मुखत्यारीचे वेळींच सरकारचा ठराव नंबर ६७० ता. ५ फेब्रुवारीचा असा झाला आहे कीं, राजेसाहेबानीं महत्वाचे कामीं पोलिटिकल एजंट

साहेब यांची सल्लामसलत घ्यावी. गादीवर बसण्याच्या वेळीं जो नजराणा सरकारास दिला पाहिजे तद्व्यतिरिक्त यांच्यावर कांहीं खंडणी नसावी. दत्तक घ्यावयाचें झाल्यास सरकारचे मंजुरीशिवाय घेऊं नये आणि औरस संतति असल्यास वडील मुलाकडे गादीचा हक्क असावा.

हें संस्थान अत्यंत डोंगराळ आहे. येथली हवा चांगली नाहीं. जाण्यायेण्याचे रस्ते सुरक्षित व सुगम नाहींत. या संस्थानांत लष्करी लोक ठेवण्या इतकें संस्थानचें सामर्थ्य नाहीं. कांहीं थोड्याशा पोलिस लोकांवरच बंदोबस्ताचें काम चालतें. येथें व्यापार नाहीं. साधारण जिन्नससुद्धां वेळेवर मिळण्यासारखा बाजार नाहीं. संस्थानचें मुख्य गांव खुद्द जव्हार येथलीसुद्धां स्थिति अशीच आहे. या संस्थानांत व्यापारी, सुशिक्षित, शहरवासी अशा लोकांचें वास्तव्य निदान जागेंयेणें तरी सुरू झाल्यावांचून येथल्या लोकवस्तीची सुधारणा होणार नाहीं. येथील राजवंश* कोळी जातीचा आहे.

पूर्वी संस्थानांत कांहीं लोकांनीं घालमेल केली होती, या लोकांस या संस्थानांतून काढून लाविलें होतें व याजबद्दल दप्तरी हुकूमही आहेत. पण हे लोक पुन्हा संस्थानांत येऊन त्यांनीं पूर्वीसारखींच घालमेलीचीं कामें सुरू केलीं आहेत. संस्थानांत अद्यापि व्हावी तशी सुधारणा झाली नाहीं. राजेसाहेब यांच्याजवळ पोक्त व अनुभवशीर कोणी

*यांच्या नांवापुढें 'शहा' हा प्रत्यय कां लावतात याचें कारण समजत नाहीं. कदाचित मुसलमानी बादशाहींत यांनीं या पदवीचें अनुकरण केलें असेल.

लोक नसल्यानें राजेसाहेबाकडे कधीं काळीं कोणी पांथस्थ गेल्यास त्याची भेटही होत नाहीं असा प्रकार आहे.

राज्यव्यवस्था चालविण्यास चांगले हुशार लोक असल्याशिवाय कधिंही सुरळीत व्यवस्था चालणार नाहीं. सर्व अंमलदार बिन्न परीक्षेचे व कोठें काम न केलेले असेच फार आहेत. शाळाखात्याची सुधारणा येथें जशी व्हावी तशी अद्याप मुळींच नाहीं. पूर्वी सारखीच प्रजा रानटी आहे.

राजेसाहेबांचे व त्यांच्या मातोश्रीचें कांहींएक कारणावरून वांकडें पडलें आहे व यामुळें सरकारांत फिर्याद ही झाल्याचें समजतें, उभयतांकडून बराच पैसा खर्च होत आहे यांत कार्यसाधु लोकांचें बरें आहे, पण या गोष्टीचा राजेसाहेबांनीं चांगला विचार करून हा ग्रहकलह मिटवावा हें फार चांगलें. यापासून पैसा जाऊन दुर्लौकिक मात्र होणार आहे.

प्रकरण सहावें समाप्त.

---

नेटिव राजांचा इतिहास
भाग दुसरा समाप्त